# अल्प परिचय



**वेंदमूर्ती विनायक वासुदेव भातखंडे**

जन्म : २८ ऑक्टोबर १९४२

दशग्रंथी, वेदाचार्य श्री. वासुदेव हरी भातखंडे शास्त्री यांचे ज्येष्ठ सुपुत्र. प्राथमिक शिक्षण अलिबाग तालुक्यांतील नागांवमध्ये व त्याचबरोबर वडिलांजवळ नित्यनैमित्तिक वेदाध्ययन. शालेय शिक्षण खंडित करून १९५५ ते १९६६ पर्यन्त पुणे येथील वेदशाळेत वेदाचार्य द. पां. किंजवडेकर गुरुजींच्या मार्गदर्शनाखाली ऋग्वेद शाकल शाखेचे षडंग अध्ययन. १९६६ मध्ये एस.एस.सी. होऊन अल्पकाळ अलिबाग येथे झेड.पी. मध्ये नोकरी. त्यात मन न रमल्याने वडिलांच्या मार्गदर्शनाखाली याज्ञिक कर्म शिकून १९६८ पासून डोंबिवलीत पौरोहित्य करत स्थाईक. १९८५ साली वडिलांकडून दशग्रंथीची संथा प्राप्त. ह्यापुढील काळांत हिन्दू धर्माशी निगडीत, सोपी, सुलभ पुस्तके लिहिण्याचा मानस.



**प्रि. विलास मोरेश्वर कर्णिक, एम.ए.**

जन्म : २९ जून १९४२

डोंबिवलीतील ज्ञानदीप क्लासेस ह्या शिक्षण संस्थेचे संचालक. ३३ वर्षांचा व ४० हजारापेक्षा जास्त विद्यार्थ्यांना शिकवण्याचा समृध्द अनुभव. अर्थशास्त्रावरील प्रभुत्व व सोप्या शैलीमुळे विद्यार्थीप्रिय शिक्षक. सायन्स, कॉमर्स व शालेय शिक्षण (मराठी व इंग्रजी माध्यम) ह्या तिन्ही शाखा तितक्याच यशस्वीपणे चालविणाऱ्या क्लासचे संचालक. प्रसिध्दी पराङ्मुख.

श्री. भातखंडे गुरुजींच्या आग्रहामुळे मराठी लेखनात प्रवेश.

# संस्कार दर्शन




**लेखनसहाय्य**

**प्रि. विलास मोरेश्वर कर्णिक, एम.ए.**

**ज्ञानदीप क्लासेस, डोंबिवली.**

# अनुक्रमणिका

प्रकाशक/पुस्तक मिळण्याचे ठिकाण :
प्रि. विलास मोरेश्वर कर्णिक, एम्.ए.
ज्ञानदीप क्लासेस,
सत्यम को.ऑ.हौ.सो.लि.
रामनगर, डोंबिवली (पूर्व)
टेलि.फोन नं. २८६२४३८

प्रथम आवृत्ती, फेब्रुवारी २००९
मूल्य : १५/– फक्त

मुद्रक :
राधिका प्रिंटर्स
८, नव-वृषाली को.ऑ.हौ.सो.,
आगरकर रोड, डोंबिवली (पूर्व)
फोन नं. २४४७७१९

|| श्री ||

# प्रस्तावना

प्रस्तुत पुस्तकामध्ये कोणतीही नवनिर्मिती नाही. हिंदू धर्मामध्ये सांगितलेल्या सोळा संस्कारांची माहिती देणारे अनेक ग्रंथ उपलब्ध आहे; परंतु बऱ्याचशा पुस्तकांची भाषा ही आकलनांस कठिण जाते, हे लक्षात घेऊन, सोप्या भाषेमध्ये हे संस्कार सांगण्याचा प्रयत्न केला आहे.

पुस्तक वाचताना, सर्व संस्कार एकाचवेळी न वाचता, एक अथवा दोन संस्कार एकावेळी वाचल्यास समजण्यास सोपे जातील. पुस्तकांत सांगितलेल्या संस्काराखेरीज नित्यनेमाने काही गोष्ट कराव्यात. उदा.- पहाटे लवकर उठून, अंथरुणातच बसून आपल्या दोन्ही हातांची ओंजळ करून 'कराग्रे वसते लक्ष्मी' ह्या श्लोक म्हणावा. प्रत्येक बोटाच्या तळातील भागावर विष्णू असतात. त्यांच्या दर्शनाने धन, विद्या व स्वास्थ्य मिळते. नंतर मुखमार्जन करून सात नद्या व सप्त सागरांचे स्मरण करून 'हरगंगे' असे म्हणून स्नान करावे. त्यामुळे तेज व उत्साह वाढतो. नंतर संध्या, देवतार्चन करून, कपाळाच्या मध्यभागी गंध व कुंकू लावावे. त्यायोगे ज्ञानचक्षूंची पूजा होते. स्त्रियांनी भांगामध्ये कुंकू भरावे; कारण गंगा, यमुना व सरस्वती ह्या नद्यांचे उगमस्थान तेथे आहे. ह्या तीन नद्यांचा संगम मानेजवळ होतो, म्हणून त्रिपेडी वेणी घालून त्या संगमाची पूजा करतात. स्त्रीमधील मांगल्याचे त्यायोगे दर्शन होते. शरीरातील ऊर्जा समप्रमाणात रहावी, म्हणून स्त्री-पुरुषांनी निदान एकतरी सुवर्णालंकार घालावा. रोज स्नानानंतर सूर्य, आई-वडील व कुलदेवतेला नमस्कार करावा. संध्याकाळी चंद्रदर्शन घ्यावे, असे नित्यनेमाने केल्यास आयुष्यात कोणतीच गोष्ट कमी पडणार नाही.

त्याचप्रमाणे ज्या वास्तूत आपण रहातो, त्या वास्तूत शांती, पुष्टी व तुष्टी मिळावी म्हणून वर्षातून एकदा वास्तुशमन शांती करावी. सकाळी भूपाळ्या म्हणणे, जेवतांना मौन धारण करून जेवणे, संध्याकाळी देवाजवळ दिवा-उदबत्ती लावणे यामुळे वास्तू सकाळ, दुपार, संध्याकाळी भतथास्तु* असे म्हणते.

हे पुस्तक लिहिताना सौ. स्वाती प्रितम दादरकर ह्यांनी हस्तलिखित लिहून बहुमूल्य सहाय्य केले आहे. लेखक त्यांचे ऋणी आहेत.

पुस्तकातील मजकुराबद्दल काही शंका असल्यास, त्याचे निरसन करणे हे लेखक आपले कर्तव्य समजतात.

– लेखक –

॥ श्री ॥

## १. गर्भाधानविधिः

मनुष्याच्या जन्माच्या आधीपासून हिन्दू धर्माप्रमाणे त्याच्यावर संस्कार चालू होतात. जन्मापूर्वी होणारा सर्व प्रथम संस्कार म्हणजे विवाहानंतर पतीने पत्नीच्या ठिकाणी करावयाचा गर्भसंस्कार होय. हा संस्कार गर्भाधान या नावाने ओळखला जातो. हा संस्कार केला गेला नाही तर होणारी संतती कुळाला उत्कर्षदायक ठरत नाही आणि म्हणुनच सर्व विवाहित जोडप्यांनी गर्भाधान हा संस्कार अवश्य करावा.

हा संस्कार निशाकाली म्हणजेच रात्री करावयाचा असतो. ह्या बाबतीत घेण्याची मुख्य काळजी म्हणजे विवाह झाल्यानंतर पती-पत्नीने संस्कार होईपर्यंत शरीरसंबंध ठेवावयाचा नसतो. स्त्री रजस्वला झाल्यानंतर तीन दिवस विटाळशी म्हणजे अशुध्द असते. त्यातील प्रथम दिवशी ती चांडाळी म्हणजे अस्पृश्य - जर दुसऱ्याला स्पर्श करेल तर, दुसऱ्या दिवशी ब्रह्मघातकी म्हणजे ब्राह्मण मारण्याचा दोष देणारी व तिसऱ्या दिवशी रजकी म्हणजे ३ दिवस ऋतु असणारी असते. चौथ्या दिवशी मात्र ती पतिसेवेकरिता शुध्द असते. पण गर्भाधानविधि पार पडेपर्यंत नवविवाहितांनी थांबणे आवश्यक आहे.

गर्भाधान संस्कार हा स्त्रियांना रजोदर्शन झाल्यापासून सोळा दिवसांत करणे आवश्यक आहे. हा काळ ऋतूकाळ आहे. परंतु चौथा, अकरावा व तेरावा दिवस वर्ज्य करावा. पहिले तीन दिवस सुध्दा टाळावेत व उरलेल्या दहा रात्री संस्कारास योग्य आहेत, असे शौनक ऋषींनी सांगितले आहे. विधी जर समरात्री म्हणजेच चौथ्या, सहाव्या, आठव्या, दहाव्या, बाराव्या, चौदाव्या अथवा सोळाव्या रात्री केल्यास पुत्रप्राप्ती होते असे शास्त्र सांगते. त्याचप्रमाणे पाचव्या, सातव्या, नवव्या, अकराव्या, तेराव्या अथवा पंधराव्या रात्री म्हणजेच विषम रात्री हा विधी केल्यास कन्यारत्न प्राप्त होते असे शास्त्र सांगते. अशी फलप्राप्ती होण्यासाठी उभयतांनी पूर्व रात्री (रात्रौ नऊ ते अकरा) व उत्तररात्री म्हणजे पहाटे चार ते सहा गमन करावे. सर्व नवविवाहितांनी हे लक्षात घ्यावे की, ह्या संस्कारापूर्वी जर स्त्री गर्भिणी झाली, तर ती संतती दोषयुक्त होते.

गर्भाधानासाठी खालील विधी त्याच क्रमाने करावे.-

१) शौनक ऋषींच्या मते गर्भाधानविधि करण्याआधी भुवनेश्वरी, इंद्र व इंद्राणी ह्याची स्थापना करुन भुवनेश्वरी ही शांत करावी. सध्याच्या काळात हा विधी ऐच्छिक धरला जातो, कारण त्यासाठी तीन ते चार तास लागतात.

२) संस्कार करणाऱ्या गुरुजींचे स्वागत करावे. त्यानंतर गुरुजी विवाहित जोडप्याच्या देहशुध्दीसाठी पंचगव्य देतील. तसेच पतीला कर्मानुष्ठान सिध्दीकरिता यज्ञोपवीत (जानवे) देतील.



३) त्यानंतर यजमानाने आचमन, प्राणायाम आणि देश काळाचा उच्चार करुन, "ह्या माझ्या पत्नीच्या गर्भामध्ये संस्कार बाहुल्याने हिचे ठिकाणी होणाऱ्या सर्व गर्भांचे बीज पापमुक्त होण्यासाठी गर्भाधान संस्कार करतो" असा संकल्प करावा.

४) त्यानंतर गणपतीपूजन व पुण्याहवाचन करावे. पुण्याहवाचन पंचवाक्यानुसार नसावे, तर ते स्वस्तिवाचन असावे. ह्या संस्कारासाठी क्रतुदक्ष ही देवता पुजली जाते, म्हणून तिचा उल्लेख नांदीश्राध्दात करावा.

५) त्यानंतर होमकुंडावर स्थंडिलकर्म करुन (वेदीशुध्दी) अग्नी चेतवावा व त्यावर भात (चरु) शिजवावा. पण त्या आधी पतीने पत्नीस दोन्ही हातांच्या मध्यमा व अनामिका या बोटांनी जेवढे तांदूळ उचलले जातील तेवढेच तांदूळ भात शिजवावयाच्या पात्रात द्यावे. पत्नीने तांदूळ स्वच्छ धुवून त्यात पाणी घालून अग्नीवर ठेवावे. ह्या विधीस प्रोक्षणव निर्वाणविधि म्हणतात.

६) भात शिजेपर्यंत गुरुजी आज्यभागापर्यंत सर्व आवश्यक कर्म करतात. आता यज्ञवेदी आहुतीस योग्य झाली.

७) प्रजापतीला भाताची आहुती, विष्णूला सहा वेळा तुपाची आहुती, पुन्हा प्रजापतीला एक तुपाची आहुती दिल्यानंतर पतीने पत्नीच्या मागे उभे राहून तिच्या मस्तकावर उजव्या हाताचा तळवा ठेवल्यावर गुरुजी "अपनः शोशुचदघं" या सूक्ताचे आठ मंत्र म्हणतील.

८) त्यानंतर पतीने पत्नीच्या मागे उभे राहून तिची मान आपल्या उजव्या गुडघ्यावर टेकवून आपला डावा हात पत्नीच्या हनुवटीखाली धरून तिच्या उजव्या नाकपुडीत अश्वगंधा वनस्पती किंवा दुर्वांचा रस उजव्या हाताच्या अंगठ्यावरून पिळावा. त्यावेळी गुरुजींनी सूर्यस्थानाचे पाच मंत्र म्हणावे. दुर्वांचा रस अतिशय थंड असल्यामुळे, घातक पदार्थांचे पाणी होऊन गर्भाशय शुध्द, स्वच्छ व मोकळे होते.

९) गुरुजींचे कार्य वास्तविक येथे संपते. गुरुजी पती-पत्नीना सुशोभित शयनगृहात जाण्यास सांगून खालीलप्रमाणे कृती करावयास सांगतात-

अ) मंचकावर बसून पतीने 'गंधर्वस्य विश्ववसो' हा मंत्र म्हणून पत्नीचे मुखावलोकन करावे.

ब) त्यानंतर पुढील सात मंत्र म्हणून स्त्रिच्या दृश्येद्रियांना स्पर्श करावा.

१) विष्णुर्योनिंकल्पयतुत्वष्टा रुपाणि पिंशतु
आसिंचतु प्रजापतिर्धातागर्भंदधातुते ।

२) गर्भंधेहिसिनीवालि गर्भंधेहिसरस्वति
गर्भंते अश्विनौ देवा वाधत्तां पुष्करस्रजा

३) हिरण्ययी अरणीयं निर्मंथतो अश्विना
तंते गर्भंहवामहे दशमे मासि सूतवे

४) नेजमेषपरापत सुपुत्रः पुनरापत
अस्ये मे पुत्र कामार्थं गर्भमाधेहियः पुमान्

५) यथेयं पृथिवी मह्युत्ताना गर्भमादधे
एवत गर्भमाधे हि दशमे मासि सूतवे

६) विष्णोश्रेष्ठेने रुपेणास्यांनार्यांगवीन्यां
पुमांसंपुत्रानादेहि दशमे मासि सूतवे

७) प्रजापते न त्वदेतान्यन्यो विश्वाजातानि परिता बभूवा ।
यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु वयं स्याम पतयो रयीणां ॥

क) त्यानंतर खालील तीन मंत्र म्हणून पती-पत्नींनी एकत्र यावे व तेच तीन मंत्र म्हणून विलग व्हावे.

१) तांपूषांच्छिवतमामेर यस्वस्यांबीजं मनुष्यावपंति
यानऊरुउशती विश्रयाते यस्यामुशंतः प्रहरामशेषं

२) योगर्भमोषधीनां गवांकृणोत्यर्वतां
पर्जन्यः पुरुषीणां

३) अहं गर्भमदधामोषधींष्व हं विश्वेषुभुवनेष्वंतः
अहं प्रजाअजनपं पृथिव्या महंजनिभ्यो अपरीषु पुत्रान्
गर्भाधानविधि संपूर्ण झाला.

## ज्योतिष शास्त्रानुसार

चंद्र शुभग्रह : पत्रिकेतील लग्नात अथवा केंद्रात पंचम, नवम स्थानात शुभ ग्रह असताना एकत्र यावे.

रजोदर्शनानंतर चार रात्री, आई-वडिलांचे श्राध्दाचे दिवस, त्याचे मागला व पुढील दिवस, ५ पर्वकाळ, सूर्यसंक्रांत, मघा, मूळ, रेवती ही नक्षत्रे, अष्टमी, चतुर्दशी, पौर्णिमा, अमावस्या, ग्रहणयोग हे एकत्र येण्यास वर्ज्य.

## गर्भरक्षणाचे उपाय

दुसऱ्या/तिसऱ्या महिन्यात शुभ दिवशी, पांढरी रिंगणी, वडाच्या पारंबीचा कोंब, डिंगऱ्या, महाबळाची पिवळी फुले, लघुचिकण्या ही औषधे गाईच्या दुधात उगाळून, पत्नीचे उजव्या नाकांत ३ ते ४ थेंब घालावे किंवा वडाची कोमल पाने अथवा वडाची पारंबी आणि गुळवेल वस्त्रगाळ चूर्ण करुन हुंगण्यास द्यावे अथवा पाण्यातून नाकांत घालावे; किंवा वडाच्या पूर्वेकडील उत्तर बाजूच्या फांदीवरील २ कळ्या, २ स्वच्छ मोठे तांदूळ, २



उडीद, २ पांढऱ्या मोहरीचे दाणे दह्याबरोबर पुष्य नक्षत्र दिवशी खावे अथवा पुष्य नक्षत्रावर पांढऱ्या रिंगणीची मुळी दुधात उगाळून ते ४ थेंब पुत्राची इच्छा असल्यास उजवे व कन्येची इच्छा असल्यास डाव्या नाकपुडीत घालावेत.

## विशेष महत्त्वाचे

गर्भपात टाळणे, गर्भिणी सशक्त होणे, प्रसूती सुलभ होणे, होणारे बालक अत्यंत निरोगी, सुंदर, पुष्ट, बलिष्ठ, दीर्घायुषी, बुध्दिमान व्हावे ह्याकरिता खालील उपाय अवश्य करावा. १ तोळा अश्वगंधा बारीक कुटून ४० तोळे पाण्यात घालून १ अष्टमांश म्हणजे ५ तोळे काढा उरविणे. त्यात १ तोळा खडीसाखर घालून सकाळी व रात्री अर्धा-अर्धा भाग पहिल्या महिन्यापासून प्रसूतीपर्यंत सेवन करावा.

## फल प्राप्त न झाल्यास

वरीलप्रमाणे विधी करुन सुध्दा गर्भधारणा न झाल्यास पितृदोष अथवा पिशाच्चदोष असण्याची शक्यता असते. तेव्हा अशा परिस्थितीत ज्योतिर्लिंगाच्या ठिकाणी जाऊन नारायण नागबळी हा विधी करावा.

## २ गर्भरक्षण तसेच पुंसवन अनवलोभन सीमांतोन्नयन संस्कार

गर्भधारणा झाल्यानंतर गर्भिणीने काही गोष्टी कटाक्षाने पाळावयाच्या असतात. उदाहरणार्थ खाली दिलेल्या गोष्टी टाळाव्यात.

१) भरभर चालणे, व्यायाम करणे, पुष्कळ मजले असलेले घर चढणे, तलावात उडी मारून स्नान करणे, प्रवास करणे.

२) दिवसा झोपणे व रात्री जागणे.

३) आंबट, तिखट, अतिथंड, अतिउष्ण, जडान्न भक्षण करणे, तंबाखू खाणे.

४) वादविवाद घालणे, अभद्र बोलणे, जास्त हसणे, आळस देणे.

५) मैथुन काढणे, रक्तपात पहाणे वगैरे.

ज्याप्रमाणे वरील गोष्टी वर्ज्य आहेत, त्याच्या उलट खालील गोष्टी अवश्य कराव्यात-

१) गुरुजनांची पूजा करणे, दान करणे.

२) काजळ घालणे, वेणी घालणे, सुगंधी पुष्प व सौभाग्य अलंकार घालणे.

३) गंधाची उटी, सुगंधी पुष्प यांचा नित्यवापर करणे.

गर्भरक्षण होण्यासाठी व बलवान बुध्दीमान व सतेज संततीसाठी शास्त्रामध्ये पुंसवन, अनवलोभन व सीमान्तोन्नयन हे विधी सांगितले आहेत.

पुंसवन म्हणजे पुमान म्हणजे वीर्यवान व बलवान संतती. अनवलोभन म्हणजे पतन म्हणजेच गर्भपात होऊ न देण्यासाठी करावयाचा संस्कार अर्थातच पूर्ण दिवस भरल्यानंतरच प्रसूती होण्यासाठी करावयाचा विधी. सीमांतोन्नयन हा विधी स्त्रिच्या मस्तकातील ग्रंथीचे रक्षण करण्यासाठी आहे. मस्तकावर म्हणजे मेंदूवर अथवा मानसिक शक्तीवर जर आघात झाला, तर मनुष्य मूर्छित होऊन त्याची चलनवलन क्रिया बंद होते. सीमंताचे ठिकाणी मुख्य मानसिक शक्ती असते. म्हणून गर्भवती स्त्रीचे विचार, मानसिक शक्ती, आहार, आचार वगैरेचे प्रतिबिंब गर्भस्थ बालकावर पडते. गर्भस्थ बालकावर, त्याच्या मानसिक शक्तीवर प्रभाव पडण्याकरिता गर्भवती स्त्रीच्या मेंदूवर प्रभाव पाडण्याची आवश्यकता आहे. बालकाचे मन दृढ करण्याकरिता गर्भवतीचे मन दृढ व शांत केले पाहिजे. कोणत्या तेजाने आपले बालक युक्त व्हावे त्याच तेजाचा विचार, वाचन-मनन गर्भवती स्त्रीने केले पाहिजे.

गर्भवती स्त्री आपली शारीरिक, मानसिक शक्ती गर्भस्थ बालकाला देऊ शकते. म्हणून गर्भस्थ बालक सामर्थ्यवान करून त्याची काया पालटण्याचे गर्भवती हे एक मोठे साधन आहे. बालकाच्या यथायोग्य शिक्षणाला आरंभ गर्भापासूनच होऊन त्याची बौध्दिक शक्ती दृढ होते. केवळ शाळा कॉलेजच्या शिक्षणाने मुले चांगली निघतील ही कल्पना चुकीची आहे. म्हणूनच वरील संस्कार.



वरीलपैकी पुंसवन व अनवलोभन हे संस्कार गर्भाच्या तिसऱ्या, चौथ्या, सहाव्या अथवा आठव्या महिन्यात करावे. तीनही संस्कार एकत्र करावयाचे असल्यास चौथा, सहावा किंवा आठवा महिना घ्यावा.

संस्कारासाठी मृग, पुनर्वसु, पुष्य, हस्त, मूळ, श्रवण किवा रेवती नक्षत्र असावे.

वारांमध्ये मंगळवार, गुरुवार, शुक्रवार व रविवार ह्यापैकी जो सोईचा असेल, तो वार घ्यावा.

ज्याला अधिक खोलात जाण्याची इच्छा आहे त्याने जन्मपत्रिका, लग्नपत्रिका व नवमांश पत्रिका घेऊन अधिकारी व्यक्तींना दाखवावे.

ह्या तीनही संस्कारांना अठांगूळ, अष्टमांगल्य अथवा ओटी भरणे असे म्हणतात.

पुंसवन, अनवलोभन संस्कारासमयी खालील संकल्प सोडण्यात येतो-

या माझ्या भार्येच्या ठिकाणी उत्पन्न होणाऱ्या सर्व गर्भाचे बैजिक दोष (म्हणजे केवळ वासना, इंद्रिय सुख, शारीरिक सुख), गार्भिक म्हणजे गर्भावस्थेत असताना आईकडून येणारे, अन्नादि, मलादि दोष यांचा नाश व्हावा, पुरुषता यावी. विमल ज्ञानाचा उदय होण्याच्या आड जे-जे प्रतिरोध आहेत ते नाहिसे व्हावेत. माझ्या भार्येच्या ठिकाणी गर्भाची योग्य वाढ रोखणारी विविध शक्ती, वातावरणातून, परप्रयुक्त अभिचाराने, वांशिक दोषामुळे, अमंगल कार्य नाहिसे होऊन सकल सौभाग्याचे एकच स्थान असलेल्या महालक्ष्मीचे अतिर्भवन (प्रवेश) होऊन, प्रतिगर्भापर्यंत प्रसवशक्ती असेपर्यंत कायम टिकून रहावे.

या विधीत सूत्रकार पत्नीला बैलाच्या कातड्यावर बसवावे, असे सांगतात. त्यामुळे उत्तम बीज पत्नीच्या ठिकाणी उत्पन्न होते. हल्ली मात्र त्या ठिकाणी तांबडी शाल, धाबळी घालतात.

दधिप्राशन- पत्नीने दोन्ही हात धुवून, गुडघ्याच्या आत घेऊन, उजव्या हाताचा पसा करावा. त्यावर पतीने गाईचे दही घालावे. त्यावर पूर्वेस अग्र करुन, सातू (गहू) ठेवावा. त्याच्या दोन्ही बाजूंस उडीद ठेवावेत. नंतर पतीने तिला 'काय पितेस?' (किं पिबसि) असे विचारावे व तिने 'पुंसवन पिते' असे उत्तर द्यावे व ते दही गिळून टाकावे. नंतर पत्नीला आचमन करण्यास उदक द्यावे असे तीन वेळा करावे. दही थंड असल्यामुळे गर्भातील उष्णता कमी होते. उडीद बलवर्धनाचे कार्य करतात. गर्भास पुष्टी मिळते.

अनवलोभन - दूर्वा किंवा अश्वगंधा वनस्पती वाटून, त्याचा गोळा स्वच्छ वस्त्रात घेऊन, गर्भिणी पत्नीला पूर्वेस तोंड करुन बसवून, पतीने पत्नीच्या मागे उभे राहून, तिचे तोंड वर करुन, तिच्या उजव्या नाकपुडीत, आपल्या उजव्या हाताच्या अंगठ्यावरुन रस पिळावा. पत्नीने नाकातून दुर्वांचा रस उदरापर्यंत गेल्यावर, तिने आचमन करावे. नंतर तिच्या डोक्यावर संपूर्ण तळहात ठेवावा. यावेळी प्रजावत्त सूक्त, जीवपुत्र सूक्त म्हणावीत. स्त्रीच्या ठिकाणी अग्नितत्वाची वृद्धी होण्यासाठी व दुष्ट गर्भजलाचा नाश होऊन,

गर्भवृध्दी व्हावी म्हणून रसाहुती आहे. हा सोहळा प्रजापतीला उद्देशून भाताचा होम होऊन अनवलोभन संपते.

## सीमांतोन्नयन संस्कार

विधीच्या सुरवातीस घाताला दोन वेळा, राकाला दोन वेळा, श्री विष्णूला तीन वेळा व प्रजापतीला एक वेळा आहुती देतात. त्यानंतर पत्नीच्या सन्मानार्थ, तिच्या केशरक्षणासाठी, भावी संततीची मानसिक शक्ती वाढावी, यासाठी पतीने हातामध्ये उंबराच्या फळांचा घोस व तीन ठिकाणी पांढरे डाग असलेले साळिंदराचे पीस व दर्भांकूर घेऊन, स्त्रीच्या भांगापासून वेणीपर्यंत न्यावे. उंबराच्या घोसामध्ये सम म्हणजे दोन, चार, सहा फळे असावीत. साळिंदराची पीसे विषम म्हणजे एक, तीन, पाच वगैरे असावीत. पतीने हात फिरवत असता "ॐ भू र्भुवस्वः" हा मंत्र म्हणावा. स्त्रीने आदल्या दिवशी भिजत टाकेल्या ३२ गव्हांची व १६ उंबराच्या फळांची माळ ओवून गळयात घालावी. ती हृदयावर काही काळ असल्याने, स्त्रीच्या दुग्धग्रंथी शुध्द होऊन सक्षम होतात. उंबरबीजामध्ये जसे जीव सुरक्षित रहातात, तसा तुझा गर्भ सुरक्षित राहो, असे म्हणून पतीने स्वस्थानी बसावे. वीणा वादनादि कार्यक्रम करुन होम समाप्त करावा. इथे सीमांतोन्नयानाची सांगता झाली.

## सुखाने प्रसूती होण्याचे उपाय

१) प्रसूती होण्यास विलंब झाल्यास भयंग ऋषीने सांगितल्याप्रमाणे स्नान करुन, पवित्र ठिकाणी बसून, ताम्हणात पाणी घेऊन, त्यात दर्भ ठेवून 'विजिहिष्येति वनस्पते' या सूक्ताचा ११ वेळा जप करून ते पाणी गर्भिणीच्या अंगावर शिंपडावे किंवा पिण्यास द्यावे.

२) 'हिमवत्युतरे' हा मंत्र १०० किंवा १००० वेळा म्हणून दुर्वांकुराने तिळाचे तेल ढवळून गर्भस्थानी लेप लावावा व थोडे तेल पिण्यास द्यावे.

३) वेलचीची साल, कडुनिंबाची साल, तुळशीचे मूळ, कण्हेरीचे बी, कवठीच्या झाडाचे पान हे सर्व म्हशीच्या दुधात वाटावे. त्यात तिळाचे तेल घालून ते मिश्रण योनीला लावावे. (प्रसूतिगृह) नेऋत्य दिशेस असावे. दहा पर्यंत शस्त्रे, अग्नी, टेंभुर्णीची पेटती लाकडे, पाण्याने भरलेले कुंभ, दिवा, मुसळ चित्रविचित्र रांगोळी काढून त्यावर ठेवावीत.

प्रसूती झाल्यानंतर करावयाचा संस्कार म्हणजे जातकर्मसंस्कार होय. आता आपण त्याच्याकडे वळू.



## ३. जातकर्मसंस्कार

पुत्राच्या नालच्छेदनापूर्वी, जातकर्म संस्कार करावा, असे मनुस्मृतीमध्ये सांगितले आहे. ह्याचा मुख्य उद्देश गर्भाशयातील मानसिक, शारीरिक, बौद्धिक व आयुष्यवृद्धी व्हावी असा आहे. पित्याने पुत्राचे मुख पाहून लगेच उत्तरेकडे तोंड करुन स्नान करावे. आचमन करुन, चंदन व पुष्पमाला धारण करावी. सुईणीशिवाय अन्य कोणी स्पर्श न केलेला, स्तनपान न केलेला, स्नान घातलेला, असा बालक पूर्वेकडे तोंड करून मातेच्या मांडीवर द्यावा व नांदीश्राध्दांत कर्म करून मध व तूप ह्यांचे मिश्रण सहाणेवर ठेवून त्यात सोन्याचा अंश येईपर्यंत सोने उगाळून ते रुप्याच्या अथवा कास्य पात्रात ठेवून "प्रतेददाः" या मंत्राने त्याच सोन्याने ते पुत्रास पाजावे. पुत्राच्या तोंडाजवळ आपले तोंड नेवून "मे घांते" या मंत्राने प्रथम उजव्या व त्याच मंत्राने ते सोने धुवून दोन्ही कानांवर ठेवावे. नंतर "अश्माभव इंद्रश्रेष्ठानी, अस्मेप्रयंधी" हे मंत्र म्हणून पुत्राच्या दोन्ही खांद्यांना स्पर्श करावा. रक्षण व आयुष्यवृद्धीकरिता "अंगादंगा" हा मंत्र म्हणून मुलाची ३ वेळा टाळू हुंगावी. नंतर त्या बालकाचे त्याच वेळेस नाव त्याच्या कानांत सांगावे. मातेचा उजवा स्तन धुवून "इमां कुमारो" हा मंत्र म्हणून मातेने शिशुला स्तनपान द्यावे. होम करावयाचा असल्यास, प्रबल नामाग्नि घेऊन, अग्नि, इंद्र, प्रजापती, ब्रह्मा यांना आज्याहुती द्याव्यात. होम कर्म समाप्त होते.

काही अडचणीने अथवा कुयोग असल्यास जातकर्म नामकरणाचे वेळी करावे. तेव्हा तिथी व नक्षत्र शुभ आहेत, हे जरुर पहावे. वर उल्लेखलेला अंगादंगा मंत्राचा अर्थ खालीलप्रमाणे आहे.

हे बालका तू माझ्याच हृदयापासून, शरीरापासून उत्पन्न झालेला असून, तू माझेच स्वरुप असून, पुत्र या संज्ञेने भिन्नदेही आहेस, म्हणून ईश्वर तुला १०० वर्षे आयुष्य देवो. हा बालक आयुष्य, तेज, बल, यश प्राप्त होण्यासाठी स्तनपान करो.

षष्ठी देवी पूजन - बाळंत झाल्यापासून पाचव्या अथवा सहाव्या दिवशी पित्याने स्नानादि देश काळाचा उच्चार करून, मातेसह बालकाचे आयुष्य व आरोग्यवर्धनासाठी विघ्नेश, जन्म देणाऱ्या षष्ठी देवी, जीवांतिका, शस्त्रगर्भा यांचे पूजन करून ब्राह्मणद्वारा शांतिसूक्तपाठ करवून घ्यावा. ही महाषष्ठी नारायणी या रुपाने बालकाचे जागृत अवस्थेत रक्षण करते. भूत, प्रेत, पिशाच, डाकिणी, योगिनी यांच्यापासून, श्वापदांपासून ह्या बालकाचे रक्षण करते. नंतर ब्राह्मणास दक्षिणा दिल्यावर कार्याची सांगता होते.

आता आपण नामकरण संस्कार कसा करावा, ते पाहू.

## ४. नामकरण व पालकारोहण संस्कार

जन्मलेल्या बालकाला सुंदर, सुयोग्य व सुटसुटीत नाव देणे आणि त्या नावाप्रमाणे बालकाला बुध्दी, विद्या, प्रकृती वगैरे प्राप्त होण्यासाठी परमात्म्याची उपासना करून जो विधि करतात, त्याचे नाव 'नामकरण संस्कार' होय. हा विधि जन्मापासून अकराव्या अथवा बाराव्या (शक्यतो बाराव्या) दिवशी करतात. कन्येच्या बाबतीत हा विधि तेराव्या दिवशी करुन सुध्दा चालतो. जर काही अडचण असेल तर हा विधि १०१ व्या दिवशी किंवा दुसऱ्या वर्षाच्या आरंभी जन्मतिथीच्या दिवशी करावा. हा विधि छोटा असून सोहळा मात्र मोठा असतो.

ह्या संस्कारामध्ये सर्व प्रथम नांदिश्राध्दांना पुण्याह वाचन करतात. त्यानंतर कास्यपात्रामध्ये तांदूळ घ्यावे व सुवर्णाच्या काडीने खालीलप्रमाणे नावे रेखाटावीत.

१) कुलदेवता उदा. श्री महालक्ष्मी

२) नक्षत्रदेवता उदा. अग्नि ही कृतिका नक्षत्राची देवता आहे.

३) मासदेवता- प्रत्येक महिन्याची देवता वेगळी आहे. उदा. चैत्र महिन्याची देवता कृष्ण, वैशाख महिन्याची देवता अनंत वगैरे

त्यानंतर ह्या नामदेवतांची पूजा करुन वरील सर्व नावे अपत्याच्या उजव्या कानामध्ये सांगावीत. ही नावे सांगताना नक्षत्राचे चरणाक्षर नाव सांगणे अत्यावश्यक आहे. उदा. कुठल्याही नक्षत्रात ४ चरण असतात. समजा अश्विनी नक्षत्रात तिसऱ्या चरणात बालकाचा जन्म झाला असेल तर त्याच्या नावाची सुरवात 'चो' ह्या चरणाक्षरानी व्हायला हवी. (चोलेश्वर) त्यानंतर व्यावहारिक नाव ठेवावे. त्यानंतर मुलगा असेल तर सम अक्षरी व मुलगी असेल तर विषम अक्षरी नाव ठेवावे. ब्राह्मणाकडून ब्रह्माशिर्वाद घ्यावा. नंतर शिशूला नवीन वस्त्रभूषणे देऊन सुवासिनींनी औक्षण करावे. सर्वसाधारणपणे हा विधि सकाळी करतात व मुलाला पाळण्यात घालण्याचा विधि सायंकाळी करतात.

मुलाला पाळण्यात घालण्याचा विधि हा तसे पाहता लौकिक सोहळा असतो. त्यावेळेस कुलदेवतेचे पूजन करुन नवोदित बालकास नूतनवस्त्र अलंकाराने आभूषित करतात. त्यानंतर पुष्पमालांनी सजवलेल्या पाळण्यामध्ये बालकास पूर्वेस डोके ठेवून निजवतात. हे कार्य आई आणि सुवासिनी मंगल वाद्यांच्या गजरात करतात. त्यानंतर प्रसंगास योग्य अशी गाणी म्हणली जातात. त्यानंतर आलेल्या सुवासिनींचा यथोचित सन्मान करतात.



## ५. कर्णविध, दुग्धपान व जलपूजा विधि

रोगापासून रक्षण करण्यासाठी, तसेच आयुष्यवृध्दी होण्यासाठी अलंकार धारण करण्यासाठी, संपत्ती वाढण्यासाठी कान टोचण्याची प्रथा आहे ह्यालाच 'कर्णवेध संस्कार' असे म्हणतात. हा विधी सहाव्या, सातव्या किंवा आठव्या दिवशी केल्यास दिवस शुभ आहे किंवा नाही हे पहावे लागत नाही. जर हा संस्कार वरील दिवशी करणे शक्य झाले नाही तर जन्म दिवसापासून दहाव्या, बाराव्या अथवा सोळाव्या दिवशी कान टोचावेत. त्या दिवशी तृतीया, पंचमी, अष्टमी, दशमी, त्रयोदशी किंवा पौर्णिमा ह्यापैकी तिथी असावी. कन्येच्या बाबतीत प्रथम डावा कान टोचावा तर पुत्राचा प्रथम उजवा कान टोचावा. बालकाचे आठ अंगुळे लांबीची सुई असावी. राजपुत्राचे कान सुवर्णाच्या सुईने टोचावे, ब्राह्मण व वैश्य ह्यांच्यासाठी रुप्याची सुई वापरावी तर शुद्रासाठी सुई लोखंडाची असावी. सूर्यकिरण आत शिरेल इतपतच भोक असावे. कर्णवेधावाचून जर पित्याने अपत्यास पाहिले तर त्याचे पूर्व पुण्य नष्ट होते.

तसे पाहता बालक जन्म झाल्यापासूनच स्तनपान करीत असते, परंतु बालकाची जशी वाढ होते तसे हालचाल करण्याचे प्रमाण वाढून स्तनपान करताना मातेस इजा होण्याची शक्यता असते. ती टाळण्यासाठी व बालकाच्या स्वास्थ्यासाठी दुग्धपानविधि सांगितला आहे. जन्म झाल्यापासून ३१ व्या दिवशी किंवा दुसऱ्या जन्मनक्षत्री हा विधि करावा. कुठल्याही परिस्थितीत अन्नप्राशनाच्या आधी हा विधि होणे आवश्यक आहे. मध्यान्हकाळी कुलदेवता व ब्राह्मण ह्यांचे पूजन करावे. मातेनी आणि सौभाग्यवती स्त्रियांनी बालक, बालिकेस अलंकृत करावे. बालकाचे डोके पूर्वेस अथवा दक्षिणेस असावे. त्यानंतर शंखामध्ये मातेच्या स्तनातील दूध घ्यावे व बालकास पाजावे.

जेव्हा प्रसूती मातेच्या माहेरी होते, तेव्हा १ महिन्याहून अधिक काळ बाळंतीण मातुलगृहीच रहाते. पूर्वीच्या काळी अशी पध्दत होती की, सासरी परत जाण्यापूर्वी गावाच्या वेशीवर असलेल्या उदकाच्या स्थानी जाऊन उदकाची पूजा करत असत. ही पूजा प्रसूतीनंतर एक महिना पूर्ण झाल्यावर करत.

ही पूजा सोमवार, बुधवार, गुरुवार तसेच अशुभ तिथी सोडून करावी. चैत्र, पौष व अधिक मास वर्ज्य करावेत. तसेच गुरु शुक्राचा अस्त होणारे दिवस टाळावेत. नंतर श्रवण, पुष्य, पुनर्वसू, मृग, हस्त, मूळ किंवा अनुराधा ह्यापैकी नक्षत्र असावे. शास्त्राप्रमाणे जलपूजा केल्यावरच बाळंतीण स्वगृही जाऊ शकते.

## ६. सूर्य; चंद्रावलोकन

जन्म झाल्यापासून तिसऱ्या अथवा चौथ्या महिन्यात बालकाची अवलोकन शक्ती उत्तेजित होत असते, म्हणून चौथ्या महिन्यात सूर्य, अग्नि, चंद्र व गाय यांचे दर्शन बालकाला घडवावे. ह्या संस्कारात दोन उद्देश आहेत. बागेत अथवा जंगलात नेल्यामुळे शुध्द वायुचे सेवन होते व भविष्यकाळात होणारे रोग दूर जाऊन शारीरिक उन्नती होते. दुसरे म्हणजे त्याला सृष्टी अवलोकन करण्याचे प्राथमिक शिक्षण मिळते. वर म्हटल्याप्रमाणे तिसरा किंवा चौथा महिना सांगितला आहे कारण चंद्रदर्शन स्पष्ट होण्यासाठी एकतर जन्मापासून तिसऱ्या महिन्यातील शुक्ल पक्षात येणारी प्रतिपदा, द्वितीया अथवा तृतीया धरावी किंवा चौथ्या महिन्यातील शुध्द पक्षी ज्या नक्षत्री जन्म झाला असेल तो दिवस धरावा.

देवदर्शन सुध्दा सूर्यावलोकनाच्या दिवशी करावे.

हा संस्कार करण्यास आठ दिक्पाल, चंद्र, सूर्य, वासुदेव व आकाश ह्यांचे पूजन ब्राह्मणांकडून करावे. त्यासाठी सुपाऱ्यांवर त्या-त्या देवतांचे आवाहन करुन गुरुजी पूजन करतात. ह्यानंतर (कटीसूत्र) म्हणजे करगोटा बांधणे व बालकास बसवणे. भूम्यपवेशनं हे विधि पाचव्या महिन्यात शुभ दिवशी करतात. त्यासाठी मृग, हस्त, पुष्य, अश्विनी, ज्येष्ठा, तीनही उत्तरा व रोहिणी ह्यापैकी एकतरी नक्षत्र असावे लागते. प्रथम गुरुजी स्वस्तिपुण्याह वाचन करतात व त्यानंतर पृथ्वी व वराहपूजन केले जाते. त्यानंतर घरातील देव जेष्ठ व्यक्ती व ब्राह्मण ह्यांचे पूजन करावे. जमीन शेणाने सारवून त्यावर मंडळ काढून बालकाला करगोटा बांधून बसवावे. त्यावेळी मंगलवाद्ये वाजवून, ब्राह्मणाचे आशिर्वाद घेऊन बालकाला ओवाळावे. त्यावेळी बालकाला संपूर्ण आयुष्य देण्याची विनंती करणारे, पृथ्वीमातेला उद्देशून खालील चार मंत्र गुरुजी म्हणतात.

१) चंद्रार्कयो र्दिगीशान्तं दिशाच गगनस्यच
निक्षे पार्थ मिमं दद्मीते त्वांरक्षंतु सर्वदा ।।

२) अप्रमत्त प्रमत्तंवा दिवारात्रावथा विवा रक्षंतु सततंरार्वे देवाः शक्र पुरांगमाः ।।

३) रक्षेनं वसुधेदेवी सदा सर्वगतं शुभे आयुःप्रमाणं निखिलं निक्षिपस्व हरि प्रिये ।।

४) अचिरादायुषस्त्वस्य येकेचित्परिपंथिनः
जीवितारोग्य वित्तेषु निर्दहस्वाचिरेणताम् ।।

ह्या मंत्रोच्चारामुळे जीवित आरोग्य व संपत्ती ह्यांच्या शत्रूंचा नाश होऊन बालकाचे रक्षण होते. येथे पृथ्वीमातेला मातेपेक्षासुध्दा अधिक मान दिलेला असतो.



## ७. अन्नप्राशन संस्कार

सर्वसाधारणपणे सहा महिन्यानंतर बालकाला दात येण्यास सुरवात होते. त्याचा कल माती खाण्याकडे होतो, कारण मातीमध्ये खारटपणा असतो व त्याला क्षार खाण्याचीच इच्छा होते. ह्याच काळात बालक अन्न प्राशन करण्यास योग्य होतो. बलवान बालक सहाव्या महिन्यात व साधारण शक्ती असलेले बालक आठव्या किंवा नवव्या महिन्यात अन्न पचविण्यास योग्य होतात, म्हणून अन्नप्राशन संस्कार सहाव्या महिन्यात करावा.

ह्या संस्कारात बालकाच्या पित्याने ब्राह्मणाने सांगितल्याप्रमाणे आचमन, प्राणायाम व देशकाळाचा उच्चार करुन खालील संकल्प सोडावा.

(मी, माझ्या बालकाला, मातेच्या गर्भातील मळ प्राशनामुळे झालेल्या रोगांचा नाश होण्यासाठी, शुध्द अन्न इत्यादिकांची प्राप्ती होण्यासाठी, इंद्रिये, ब्रह्मतेज, आयुष्य यांचा लाभ होण्यासाठी, बीज गर्भापासून झालेल्या पापांचे निरसन होण्यासाठी अन्नप्राशन नावाचा संस्कार करतो.)

ह्यानंतर मुलाला सजवून, आईच्या मांडीवर पूर्वेकडे तोंड करुन बसवावे. पुण्याह वाचन व इष्टदेवता पूजन करुन, दही, मध, तूप मिश्रित अन्न चांदीच्या किंवा कांस्याच्या पात्रात घ्यावे. मातेने 'अन्नपते' ह्या मंत्राने पहिला घास भरवावा. नंतर ब्राह्मणांचे आशिर्वाद घेऊन त्यांना भोजन व दक्षिणा प्रदान करावी. होम करावयाचा असल्यास शुची नावांच्या अग्निची स्थापना करावी.

आधी म्हणल्याप्रमाणे बालक माती खाण्याचा प्रयत्न करते ते टाळावयाचे असल्यास शुध्द माती भाजून त्यात थोडा मध घालून चाटण्यास दिली तर पुन्हा माती खाण्याची इच्छा होत नाही. अन्नप्राशन संस्कार म्हणजे अन्नभक्षण संस्कार नव्हे. त्याला थोडे-थोडे अन्न व दुध दयावे. एक वर्षानंतर स्तनपान पूर्णपणे वर्ज्य करावे. तूप भात किंवा तूप मध दहीमिश्रित भात दयावा. भात शिजत असतानाच त्यात तूप घालावे आणि तीत शिजल्यावर एक तोळा मध व एक चमचा दही घालावे. तूप व मध समभाग देऊ नये, कारण त्याने विषनिर्मिती होते. अशाप्रकारच्या अन्नप्राशनाने बालक तेजस्वी व पराक्रमी होते. (दात येण्याच्या सुमारास डिकेमालीची कांडी उगाळून दिल्यास लाभदायक राहील.)

## ८. जावळ आणि वर्धापन संस्कार

प्रथम केश खंडन - म्हणजेच जावळ काढणे. हा विधि प्रथम वर्ष पूर्ण होण्याआधी परंतु सहा महिन्यानंतर करावा. विधियुक्त व योग्य वेळी प्रथम केशरखंडन करण्याचा उद्देश त्वचेचे रोग दूर व्हावे डोक्यातील सर्व भागाला योग्य तो रक्त पुरवठा व्हावा, हा आहे. केसांमध्ये गुंता निर्माण होत नाही. बालकाला हलकेपणा वाटून जीवन सुखावह वाटते.

मुलाचे जावळ सममासात व मुलीचे जावळ विषम महिन्यात करावे. जावळ हे फक्त उत्तरायणांतच होते. सर्वसाधारण १४ जानेवारी ते १४ जुलै ह्या काळात करावे. ह्यासाठी पुनर्वसू, पुष्य, अश्विनी, मृग, श्रवण, धनिष्ठा, शततारका, हस्त, चित्रा, स्वाती ही नक्षत्रे शुभ आहेत. तसेच सोमवार, बुधवार, गुरुवार, शुक्रवार हे शुभ वार समजले जातात. ह्यात सुध्दा अष्टमी व अमावस्या वर्ज्य करावी. म्हणजेच गुरुजीकडून काळजीपूर्वक प्रथम केश खंडनाचा दिवस काढावा. केशखंडनानंतर मस्तकाला मलई लावावी.

प्रथम वर्धापनदिनी म्हणजेच बालकाच्या पहिल्या वर्षाच्या वाढदिवशी यजमानांनी अर्थात बालकाच्या पित्याने आचमन, प्राणायाम व देश काळाचा उच्चार करुन, परमेश्वर प्राप्तीसाठी व आयुष्याच्या वृध्दीसाठी संकल्प सोडावा. त्यानंतर नांदीश्राध्द, पुण्याहवाचन झाल्यावर गुरुजींनी पुढील संस्कारासाठी अधिकार प्रदान करावा. गुरुजी खालील क्रमाने वर्धापन संस्कार विधि पार पाडतील.

१) अग्निस्थापना - अग्निचे नाव बलवर्धन

२) प्रधान देवता म्हणजेच मृत्युंजयाची स्थापना करतील.

३) नंतर तीन-तीन दूर्वा तूपामध्ये बुडवून अथवा दही, मध, तूप यांच्या मिश्रणात बुडवून एकशे आठ आहुती दिल्या जातील. त्यावेळी "त्र्यंबकं यजामहे" ह्या मंत्राचा उच्चार केला जाईल. त्यानंतर "आनोभद्रा" हा मंत्र म्हणत दहा वेळा भाताची आहुती दिली जाईल.

४) त्यानंतर "इमंस्तोमं" या मंत्रानी सोळा आहुती दिल्या जातील.

५) "जातवेदसे" या मंत्रानी एक आहुती दिली जाईल. अशाप्रकारे एकूण सत्तावीस आहुती दिल्या जातील.

६) त्यानंतर चंद्र, वरुण, नक्षत्र देवता, वासुदेव स्व नामदेवता ह्यांची पुजा करुन होम समाप्त केला जाईल. त्यानंतर बालकास सात चिरंजीवांची प्रार्थना करून तीळ आणि गूळमिश्रित दुध प्राशन करण्यास दयावे. गुरुजींना गाय, भूमी, सुवर्ण ही दाने देऊन यथाशक्ती दक्षिणा दयावी. सुवासिनी व इतर आप्तेष्टांना भोजन वगैरे देऊन वर्धापन दिनाचा आनंद लुटावा.

शास्त्राप्रमाणे वयाच्या पन्नास वर्षापर्यंत हा विधि करणे, अपेक्षित आहे, परंतु आजकालच्या धकाधकीच्या जीवनात हे शक्य नसल्याने कमीत-कमी वर्धापनदिनी नूतन वस्त्र परिधान करुन, गोड पदार्थ करावा. ज्याचा वाढदिवस आहे. त्याला यथोचित व्यक्तीने औक्षण करावे.



पन्नास वर्षापासून दर पाच वर्षांनी खाली सांगितलेल्या विविध शांती कराव्यात.

| | |
|---|---|
| ५० व्या वर्षी | वैष्णवी |
| ५५ व्या वर्षी | वारुणी |
| ६० व्या वर्षी | उग्ररथ (साठीशांत) |
| ६५ व्या वर्षी | मृत्युंजय |
| ७० व्या वर्षी | भैमरथी |
| ७५ व्या वर्षी | ऐन्द्री |
| ८० व्या वर्षी | सहस्त्रचंद्रदर्शन |
| ८५ व्या वर्षी | रौद्री |
| ९० व्या वर्षी | सौरी |
| ९५ व्या वर्षी | त्रंबक महारथी |
| १०० व्या वर्षी | महामृत्युजय |

## ९. चौल संस्कार अर्थात चुडा कर्म म्हणजेच शेंडी ठेवणे

ह्यापुढील मुंजीपर्यंतचा कोणताही संस्कार करताना, कोणतीही प्रतिकूल घटना घडल्यास, खालील शांती अथवा होम केल्यास, प्रतिकूल घटनेचा दोष जाऊन, मंगल कार्याकरिता अनुकूलता प्राप्त होते.

१) विनायक शांती - या शांतीमध्ये गणेशाला आवाहन करुन दुष्टप्रवृत्तींचा नाश केला जातो.

२) कूष्मांड होम - हा होम आत्तापर्यंत हातून घडलेल्या पापक्षालनासाठी असतो.

३) बृहस्पती शांत - गुरु प्रतिकूल असल्यास, त्याला अनुकुल करण्यासाठी ही शांत करावी.

चौल संस्कार जन्मापासून अथवा गर्भापासून पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या किंवा पाचव्या वर्षी अथवा उपनयनाबरोबर करावा. प्रत्येक कुटुंबात जसा कुळाचार असेल, तसा करावा. शिखा ठेवण्याची चाल अत्यंत प्राचीन असून ऋग्वेदांमध्ये वसिष्ठ ऋषींच्या शेंडीचा उल्लेख आहे. शिखा केवळ सामाजिक चिन्ह नाही तर दीर्घ आयुष्याचे साधन आहे. ही शिखा मस्तकातील नाजुक भागाचे रक्षण करणारी आहे. मस्तकाच्या ज्या भागावर आत व बाहेर केसांचा भोवरा असतो. त्या ठिकाणी शिरा व सांधे यांचा मिलाफ असल्यामुळे ती जागा नाजुक असते. तिला धक्का लागू नये, म्हणून काळजी घ्यावी लागते. मेंदूच्या अत्यंत महत्त्वाच्या भागाची वाढ होऊन बुध्दी तरतरीत होते. हिंदुस्थानात कित्येक पूर्ण जटाधारी, दक्षिणी अर्धजटाधारी, उत्तर हिंदुस्थानात, मध्यप्रांत, गुजराथ, सिंध, राजस्थान येथे आर्य लोक शिखाधारी असतात. ज्याच्या डोक्यावर शिखा आहे. तोच आर्य समजला जात असे. परदेशात व अन्य देशांतील सर्व चिन्हे वापरण्यास पैसे लागतात. आर्यांचे शिखा हे चिन्ह इतके स्वस्त आहे की, त्याला पैसे लागत नाहीत. आर्यांचे मुख्य चिन्ह शिखा व यज्ञोपवीत आहे. उपनयन व चौल हे दोन्ही संस्कार शास्त्रदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचे. ते ब्राह्मणवर्गात चालू असून ते सर्व भारतात रुढ होणे, अत्यंत जरुरीचे आहे. उत्तरायणात गुरु शुक्रांचे अस्त नसता, शुभ तिथी, वार, नक्षत्री दिवसा माघ महिन्यापासून, मध्ये चैत्र मास सोडून पाच महिने हा संस्कार करावा. गर्भाधानादि चौल संस्कारापर्यंत लोप होऊन त्याचा काळ गेला असल्यास व्याहृती होम करुन चौल करावे. ज्याचे चौल करावयाचे आहे, त्याची माता गर्भिणी असून त्या मुलाचे वय पाच वर्षाचे आत असेल तर चौल करु नये. वय अधिक असल्यास, माता गर्भिणी असेल तरी करावे. कुळाचाराप्रमाणे तीन प्रवरांनी तीन व पंच प्रवरांनी पाच याप्रमाणे शिखा ठेवावी. मौजीनंतर एकच मध्यमा ठेवावी. यजमानाने संकल्प करुन गणेश पूजन व नांदीश्राध्दात कर्म करुन सभ्य नावाच्या अग्निची स्थापना करावी. ६ पात्रांचा हा प्रयोग असून अग्निच्या उत्तरेस सालासह भात, यव, माष,(उडीद) व तीळ भरुन मातीचे परळ ठेवावेत. २५ दर्भांची जुडी ठेवावी. नंतर अग्नीसमीप असलेल्या



यजमानांच्या उजव्या बाजूस मातेने बालकास आपल्या मांडीवर बसवावे. मातेच्या पुढे बैलाच्या शेणाने व शमीपत्राने भरलेले २ परळ ठेवावेत. नंतर अग्निला एक, पवमान (विष्णू) देवतेला दोन व प्रजापतीला एक अशा आहुती देऊन नंतर केशवपन विधि करावा. २१ दर्भ घेऊन गुरुजींनी मातेच्या दक्षिणेस उभे रहावे, पित्याने मागे उभे रहावे. नंतर थंड पाणी उजव्या हातात व गरम पाणी डाव्या हातात घेऊन मुलाच्या कानाजवळ धरून दोन्ही भांड्यातील पाणी ओतावे. त्यावेळी मातेने मुलाच्या हनुवटीखाली ताम्हण धरावे. नंतर त्या पाण्यात लोणी, दही अथवा दह्यावरील साय एकत्र करून ते पाणी मुलाच्या डाव्या कानापासून पुन्हा डाव्या कानापर्यंत तीन वेळा लावावे. नंतर २१ दर्भातील ३ दर्भ पुरोहिताने घेऊन व पित्याने वस्तरा हातात घेऊन, मुलाच्या उजव्या कानावर पश्चिमाग्र धरून "येनावपत" या मंत्राने केसांसह कापावेत. तेच दर्भ पूर्वेकडे अग्र करून बैलाच्या शेणावर ठेवावेत. नंतर मातेने ते दर्भ पूर्वाग्र करून बैलाच्या शेणावर ठेवावेत. अशा रितीने एकूण ४ वेळा उजव्या कानावर "येनावपत" "येनधाता" "येनभूयश्च" या तीन मंत्रांनी ३ वेळा व ४ थ्या वेळेस सर्व एकदम मंत्र म्हणून दर्भाचे छेदन करावेत. वरीलप्रमाणे प्रत्येक वेळी १ या प्रमाणे ३ वेळा ३ मंत्र म्हणून डाव्या बाजूस सुध्दा करावे. नंतर "यत क्षुरेण" या मंत्राने अग्रभागापासून मुळापर्यंत वस्तऱ्याची धार धुवून मग नापितास बोलवावे. नंतर उष्ण व थंड अशा मिश्र पाण्याने बालकाचे मस्त भिजवावे. कुलाचार असेल तशी शिखा ठेवून बाकीचे केस नापिताने वस्तऱ्याने साफ काढावेत. "अक्षण्वन कुशली कुरु" म्हणजेच क्षत पाडता कुशलतेने केस काढावेत. नंतर कुमारांना अभ्यंगस्नान घालून, अलंकृत करून, आईच्या मांडीवर बसवून होम समाप्त करावा. हा सर्व प्रकार कन्येसही लागू आहे.

## १०. मुंज ते सोडमुंज

चौल संस्कारानंतरचा प्रमुख संस्कार म्हणजे उपनयन संस्कार होय. सोडमुंजीपर्यंत चालणारा हा संस्कार मोठा असून विस्तारपूर्वक खाली दिला आहे.

बटू म्हणजेच ज्याची मुंज करावयाची ते बालक ब्राम्हण असल्यास उपनयन संस्कार करण्याचा मुख्य काळ पाच ते आठ वर्ष आहे. व अपरिहार्य झाल्यास हा विधि सोळाव्या वर्षापर्यंत करता येतो. हा विधि करण्यास रवी, चंद्र, बुध आणि गुरु हे ग्रह शक्यतो उच्चीचे असावेत. बालक क्षत्रिय असल्यास सहा ते अकरा वर्षे का काळ योग्य असून अपरिहार्य झाल्यास मुंज बाविसाव्या वर्षापर्यंत करून चालते. जर बालकाला मंगळ असेल, तर मंगळ बलवान असण्याच्या काळात मुंज करावी. बालक वैश्य असल्यास सात ते बारा वर्षे हा काळ मुंजीस योग्य असून अपरिहार्य झाल्यास मुंज चोविसाव्या वर्षापर्यंत करावी. वैश्य बालकाला चंद्र बलवान असल्याचा काळ अतिशय योग्य होय.

उपनयन संस्काराचा दिवस अधिकारी व्यक्तीला विचारूनच ठरवावा.

उप म्हणजे जवळ व नी म्हणजे नेणे. म्हणून उपनयन संस्कार म्हणजे पित्याने किंवा पालकाने बालकास अध्ययनाकरिता आचार्याकडे नेणे. चौल कर्मापर्यंतचे सर्व संस्कार पित्याने अथवा पालकाने करावयाचे असतात. मात्र उपनयन संस्कार करण्याचे अधिकारी पिता, आजा, चुलता, भाऊ किंवा सपिंडातील किंवा गोत्रातील कोणीही किंवा बटूपेक्षा वयाने मोठा असलेले ब्राम्हण होत. त्याचप्रमाणे यजमानांच्या गुरुजींना सुध्दा हा अधिकार प्राप्त आहे. खरे तर उपनयन संस्कार अध्ययन सांगणाऱ्या गुरूने करावयाचा असतो. पण विद्यार्थ्यांना विद्याभ्यासास गुरुगृही जाण्याची चाल बंद पडल्याने, अधिकारी व्यक्तीने हा विधि पार पाडावा. जन्माने ब्राम्हण असलेला, संस्कार झालेला वेदाध्ययन केलेला असा श्रोती उपनयन करण्यास सर्वथा योग्य आहे. इतर कोणी हा विधि केल्यास तो अधिकार प्राप्त होण्यासाठी त्याने बारा हजार गायत्री मंत्र जप करावा. जुळ्या अपत्यांचा संस्कार एकाच वेळी, एकाच दिवशी व एकाच मंडपात करण्यास हरकत नाही.

वैदिक सांप्रदायाप्रमाणे अष्टमी, संक्रांत, चैत्र शुध्द तृतीया जेष्ठ शुध्द द्वितीया, माघ शुध्द द्वादशी, फाल्गुन कृष्ण द्वितीया, रिक्ता तिथी (चतुर्थी, नवमी आणि चतुर्दशी) व शनिवार हे वर्ज्य आहेत. मुंज प्रदोषकाळी (संध्याकाळी साडे सहा ते साडे आठ) करू नये.

ब्रह्मतेज, धनप्राप्ती, विद्याप्राप्ती, तेजःपुंजकांती व सर्वेच्छा पूर्ण होण्यासाठी उपनयन विधि करावा.

### उपनयन प्रयोग

आरंभी कर्त्याने आचमन करून, शरीर शुध्दीकरिता (गाईचे शेण, गोमूत्र, दुध, दही, तूप ह्या पदार्थांचे मिश्रण) प्राशन करून नूतन यज्ञोपवीत धारण करावे. त्यानंतर सुवासिनीकडून कर्त्याने कुंकूमतिलक करून घ्यावा. त्यानंतर कुलदेवता, इष्टदेवता यांचे स्मरण करून



त्यांना आमंत्रित करण्यासाठी विडा नारळ ठेवावा. तसेच घराण्यातील दिवंगत व्यक्तीचे स्मरण करून त्यातील सुवासिनींसाठी सौभाग्यवस्त्र ठेवावे. (हे वस्त्र नंतर कोणाही सुवासिनीस द्यावे) यानंतर हजर असलेल्या जेष्ठ आप्तेष्टांना व गुरुजींना वंदन करुन कर्त्याने पूजेसाठी स्थानापन्न व्हावे. त्यानंतर गुरुजी सांगतील त्याप्रमाणे आचमन करुन, देश काळाचा उच्चार करुन, पाच संकल्प सोडावेत. हे पाच संकल्प बटूला उपनयनासाठी शुध्द योग्य करण्यासाठी असतात. त्यातील दुसरा संकल्प हा कर्त्यास गुरुस्थानी नेण्यासाठी असतो. हा संकल्प अत्यंत आवश्यक आहे; कारण उपदेश करण्याचा अधिकार कर्त्याला त्यामुळे प्राप्त होतो. त्यानंतर गणेशपूजन, नांदीश्राध्द, मंडपदेवता पूजन करून, बटूला आईच्या मांडीवर बसवून, आईने भोजन भरवावे. त्यानंतर कुमाराचे वपन करून, स्नान केलेल्या बालकास मंगल तिलक करुन आचार्याने पूर्वेस तोंड करुन बसावे. त्या बालकाला समोर उभा करुन मंगलाष्टके "येयज्ञेन" वगैरे सूक्त म्हणून हरिद्रामिश्रित अक्षता टाकाव्यात. नंतर बटूला आपल्या उजवीकडे बसवून समुद्भव नावाच्या अग्नीची स्थापना करावी. नंतर आचार्याने अग्नीच्या पश्चिमेस व बटूस बाजूला बसवून लंगोटीकरिता त्रिगुणित असे कापसाचे सूत्र कमरेस बांधून लंगोटी नेसवावी. "युवंवस्त्राणि" हा मंत्र म्हणून, दुसऱ्या जन्माच्या गर्भाच्या पिशवीबद्दल मोठे शुभग वस्त्र धारण करावे. (उपनयनानंतर बालकाचा दुसरा जन्म होतो, अशी धारणा आहे) दुसरे नवे पिवळे वस्त्र पांघरुण घालावे. "मित्रस्य चक्षु" या मंत्राने हरिणाचे चर्म घालावे. त्यानंतर यज्ञोपवीत धारण करावे. यज्ञोपवीत हा मंत्र कुमाराकडून म्हणून घ्यावा हे यज्ञोपवीत परमपूज्य प्रजापतीसह उत्पन्न झाले. असे हे यज्ञोपवीत आयुष्यवर्धक, तेजवर्धक, श्रेष्ठ, शुभ्र व निर्मळ असून बालकाच्या अज्ञानाचा नाश करते. ह्यानंतर बालकाला मुंजाधिकारी व्यक्ती व समुद्भव अग्निच्या मधून उत्तर भागाकडे न्यावे. यानंतर आचार्य बालकाकडून विधिवत आचमन करून घेतील. ह्यानंतर बालकास दक्षिणेकडे बसवून प्रधान होम करावा. हा होम आधार होम असून बालकास अग्निमुख करून करतात. त्यावेळेस खालील चार मंत्र म्हणून तुपाच्या आहुती द्याव्यात-

१) अग्न आयंषी - पवस आसुवोर्जमिषंचनः आरेबाधस्वदुच्छुनां ।

२) अग्निऋषी- पवमानः पांचजन्यःपुरोहीतः तमीमहागयं

३) अग्नेपवस्व- स्वपाअस्मवर्च सुवीर्यं दधद्रयिमयी पोषं

४) प्रजापतेनत्व- न्यन्यौविश्वजातानि परिताबभूवाः यत्कामास्ते गुहुमस्तन्न

वयंस्याम पतयोरमर्णित्या

त्यानंतर आचार्यांनी अग्निच्या उत्तरेस उभे रहावे, पण त्यांचे तोंड पूर्वेस असावे. बटू त्यांच्यासमोर म्हणजेच पश्चिमेकडे तोंड करून असावा. त्यानंतर सविता देवतेची तृप्ती करण्यासाठी बटूची ओंजळ शुध्द पाण्याने भरावी. आचार्यांनी स्वतःची ओंजळ सुध्दा दुसऱ्या कोणा व्यक्तीकडून शुध्द पाण्याने भरून घ्यावी. ते पाणी बटूच्या ओंजळीत टाकावे.

ते टाकत असताना "तत्सवितृर्वृणीमहे" हा मंत्र म्हणावा. बटूने पाणी ताम्हणामध्ये सोडावे. त्यानंतर शिष्यत्व सिध्द करण्यासाठी आचार्याने म्हणजेच गुरूने बटूचा उजवा हात पाचही बोटांसह हातात धरावा. परत "तत्सवितृर्वृणीमहे" या मंत्राचा तीन वेळा उच्चार करावा.

ह्यानंतरचा विधि, बटूला सूर्यदेवतेस अर्पण करण्याचा आहे. त्यासाठी आचार्याने बटूसह मंडपाबाहेर जावे व सूर्यदर्शन करावे. त्यानंतर "देवसविता" हा मंत्र म्हणावा व सूर्यास विनंती करावी की, ह्या बटूस विदया, दिर्घायुष्य व संरक्षण देण्यासाठी मी तुला अर्पण करत आहे. त्याचप्रमाणे बटूने प्रजापतीस समर्पण होण्यासाठी, आचार्य व बटू यांनी यांच्या पहिल्या जागेवर येऊन समोरासमोर उभे रहावे. यावेळेस आचार्यांनी "कस्यब्रम्हचार्यसि" असा मंत्र म्हणावा. "युवासुवासा" या मंत्राने बटूस अर्धप्रदक्षिणीत फिरवून पूर्वेकडे तोंड करून उभे करावे. त्यानंतर बालकाच्या खांद्यावरून दोन्ही हात हृदयावर ठेवावे त्यावेळी "तंधीरास" हा मंत्र म्हणावा.

इथपर्यंतचा विधि झाल्यानंतर बटू ब्रह्मचर्याश्रमांत प्रवेश करतो व आचार्य त्याला विद्यासंपन्न, तपस्वी व योगी होऊन उत्कर्ष प्राप्त करण्याचा आशिर्वाद देतात.

ह्यानंतरचा विधि हा अग्निचे तेज बटूस प्राप्त होण्यासाठी आहे. ह्या विधिमध्ये अग्नि आणि आचार्य यांच्यामधून बटूला नेऊन, आचार्यांच्या उजव्या बाजूस बसवून त्याचे तोंड पूर्वेस करावे. नंतर बटूने अग्निभोवती पाणी फिरवावे. हे अग्निकार्य करताना गुरुजी बटूकडून अग्निसंस्कार करुन घेतील. त्यानंतर "अग्नेय समिधं" हा मंत्र म्हणून अग्नित समिधा घालून बटूने "अग्नयेस्वाहा" असे म्हणावे हा विधि अग्नी प्रसन्न व्हावा, यासाठी आहे. तसेच ह्यानंतर दोन्ही हात धुवून अग्नीवर तापवावे. त्यावेळेस "ॐ तेजसामासमनज्मी" हा मंत्र म्हणत तोंडाला (तोंड उघडे ठेवून) स्पर्श करावा. हा प्रयोग तीन वेळा करावा. मंत्राचा अर्थ अग्निने तेज दयावे, असा आहे. त्यानंतर अग्निची स्तुती करणारे मयिमेधां हे खाली दिलेले सहा मंत्र बटूने उभे राहून म्हणावेत-

१) ॐ मयिमेधां मयिप्रजां मय्यग्निस्तेजो दधातु ।

अर्थ - हे अग्नी, मला बुध्दी, शक्ती व तेज दे.

२) मयिमेधां मयिप्रजां मयीन्द्र इन्द्रियं दधातु ।

अर्थ- हे अग्नी, मला बुध्दी व शक्ती प्रदान करून माझी इंद्रिये माझ्याच ताब्यात ठेव.

३) मयिमेधां मयिप्रजां मयि सूर्योभ्राजो दधातु ।

अर्थ- हे अग्नी, मला बुध्दी, शक्ती व सूर्याचे तेज दे.

४) यते अग्ने तेजस्ते नाहं तेजस्वी भूयासम् ।

अर्थ -हे अग्ने मला तुझे तेज देऊन तेजस्वी कर.

५) यत्ते अग्ने वर्चस्ते नाहं वर्चस्वी भूयासं ।

अर्थ- हे अग्ने, मला अशा प्रकारचे वर्चस्व दे की, ज्यामुळे मला श्रेष्ठत्व प्राप्त होईल.



६) यत्ते अग्ने हरस्ते नाहं हरस्वी भूयासं

अर्थ - हे अग्ने, मी कोणाकडूनही हरला जाऊ नये.

ह्यापुढील विधि विभूती ग्रहणाचा आहे. अग्नितील भस्म पळीत घेऊन, पळी डाव्या हातात धरून, उजव्या हाताच्या तर्जनीने, भस्म विविध अंगाला खालील मंत्र म्हणत लावावे.

१) "त्र्यायुषं जमदग्ने" असे म्हणून भस्म ललाटास, म्हणजेच दोन भुवयांच्या मध्ये लावावे. जमदग्नीस माझा क्रोध माझ्या ताब्यात ठेवावा, अशी विनंती करावी.

२) "कश्यपस्य कंठे" असे म्हणून भस्म कंठास लावावे. त्यावेळेस कश्यपऋषींना माझ्या कंठातून निघणारा स्वर माझे व तो ऐकणाऱ्याचे कल्याण करो, असे म्हणावे.

३) "अगस्त्यस्य नाभौ" असे म्हणून भस्म बेंबीस लावावे. अगस्ती ऋषीस जठराग्नीचे रक्षण करण्याची विनंती करावी.

४) "यद्देवानां दक्षिणस्कंधे व तन्मे अस्तु वामस्कंधे" असे म्हणून दोन्ही खांद्यास भस्म लावावे ह्या द्वारे सर्व देवांना दोन्ही बाहूंचे रक्षण करण्याची विनंती करून त्यांच्याकडून चांगलेच कर्म व्हावे, असा आशिर्वाद मागावा.

५) "सर्वमस्तु शतायुषं शिरसी" असे म्हणून भस्म मस्तकास लावावे. हे भस्म त्रिवार अपमृत्यु टाळून शंभर वर्षांपेक्षा अधिक आयुष्य जमदग्नी, कश्यप व अगस्ती यांच्याकडून प्रदान करते.

नंतर परिसमुहन व परियुक्षण करून अग्निची पूजा करावी. परिसमुहन म्हणजे स्थंडिलांच्या सभोवती ईशान्य दिशेपासून ईशान्य दिशेपर्यंत पालथ्या हाताने पाणी फिरवणे व परियुक्षण म्हणजे उताण्या हाताने जमिनीला स्पर्श न करता पाणी शिंपडणे. नंतर बटूकडून "स्वश्नमे यज्ञोपचते नमश्चा यत्तेन्युन तस्मैत उपयत्तरिक्तं तस्मैते नमः अग्नये नमः ॐ चमे" हा मंत्र म्हणून घेतला जातो. मंत्राचे फलित म्हणजे अग्निदेवता बटूस अकरा गोष्टी अर्पण करते. ह्या गोष्टी म्हणजे श्रध्दा, बुध्दी, यश, प्रगल्भता, विद्या, व्यवहारचातुर्य, शक्ती, आयुष्य, तेज, आरोग्य आणि संपत्ती या होत.

## गायत्री उपदेश

नंतर बटूने अग्निच्या उत्तरेस जाऊन, पश्चिमेस आचार्यांच्या (म्हणजेच वडिलांच्या) समोर बसून, उजवा गुडघा जमिनीवर टेकवून दोन्ही हातांनी आपल्या दोन्ही कानांना स्पर्श करून, वडिलांचा उजवा पाय उजव्या हाताने व डावा पाय डाव्या हाताने चेपावा. नंतर बटूने "मी अमुक गोत्राचा असून, माझे नाव अमुक असून मी आपणास नमस्कार करतो" असे म्हणावे. त्याचे उत्तर म्हणून वडील बटूला देवदत्ता, तू दिर्घायुषी हो असा आशिर्वाद देतात. नंतर सावित्रीपूजन व गोप्रदान केल्यानंतर बटू, वडिलांना गायत्री मंत्र सांगावा, अशी विनंती करतो. बटूने आपला डावा हात उताणा करून, त्यावर उजवा हात पालथा ठेवून

(ह्यास ब्रम्हांजली असे म्हणतात) ते दोन्ही हात वडिलांच्या उजव्या मांडीवर ठेवावे. वडिलांनी स्वतःच्या अंगावरील वस्त्राने बटूस व स्वतःस झाकून आपल्या दोन हातात अंजली घेऊन बटूच्या उजव्या कानात गायत्री मंत्र तीन वेळा सांगावा व तितक्याच वेळा म्हणून घ्यावा. गायत्री मंत्र सांगताना "प्रणव ॐ व व्याहुती (भू भुर्वस्वः)" म्हणणे आवश्यक आहे.

ह्यानंतर वडील ममव्रत हा मंत्र म्हणून आपला उजवा हात बटूच्या हृदयावर ठेवतात. त्यावेळेस बटूच्या रक्षणाकरिता व शुध्दीकरिता बटूचे मेखलेने बंधन करावे. त्याचवेळेस बटूला बृहस्पतीनी माझी योजना तुझ्याकडून नियम पाळून घेण्यासाठी केली आहे, असे वडिलांनी सांगावे. मेखलेचे बंधन करताना "ॐ इयंदुरुक्ता" हा मंत्र बटूकडून दोन वेळा म्हणून घेऊन मेरवलेचे तीन वेढे घेऊन बेंबीवर दोन्ही टोकांच्या तीन गाठी देतात. ह्या वेळेस बटूनी तीन वेदांच्या "रहस्य" व अंगासहित वेष्टित झाला आहे, असे समजावे. ही मेखला, गृहाला शुध्द करणारी, भाग्य वाढविणारी प्राण, वायु, सामर्थ्य, सत्य, तप आणि तेजाचे रक्षण करणारी असून शत्रूचे निर्दालन करणारी, दुष्टांना नष्ट करणारी आहे. मेरवलेचे हे कार्य वेगवेगळ्या देवता करतात. उदा. अश्विदेव नेत्राचे रक्षण करतो, भगदेवी बेंबीखालील भागाचे रक्षण करते, अदितीदेवी तेज अर्पण करते, पूषादेवी पोषण करते, पृथ्वी कल्याण करते वगैरे. त्यानंतर अधर्माचा नाश व्हावा म्हणून बटूच्या पायापासून कानाजवळच्या केसापर्यंत पोहोचणारा पळसाचा दंड वडील बटूस देतात. त्यावेळेस वडील "स्वस्तिनो मिमितां" हा मंत्र म्हणतात. ह्यावर बटू, या दंडाने माझी इंद्रिये ताब्यात ठेवून, सन्मार्ग दाखवून, कोणतेही भय न रहाता माझे रक्षण करा, असे म्हणतो.

त्यानंतर वडील खालीलप्रमाणे उपदेश बटूस करतात.

तू ब्रह्मचारी आहेस. शौच, भोजनानंतर आचमन करावे. सकाळ-संध्याकाळ संध्या करून भिक्षा मागावी. अग्निकार्य करावे. १२ वर्ष ब्रह्मचर्य पाळावे. आचार्यधीन रहावे, पण आचार्य अधर्माचरण सांगेल तर ते करू नये. क्रोध व खोटे बोलणे सोडावे. विषयवासना सोडावी. गुरुपेक्षा उंच आसनावर बसू अथवा झोपू नये. नृत्य, गीत, वादय, सुगंधी पदार्थ वर्ज्य करावेत, अतिस्नान, अतिझोप, अतिभोजन, जागरण, निंदा, लोभ, मोह, भय, शोक वर्ज्य करावे. चौथ्या प्रहरी उठून शौच, दंतधावन, स्नानादि, संध्योपासना, गायत्री जप, प्राणायाम यांचे नित्य नियमाने आचरण करावे. क्षौर वपन करू नये. मद्य, मांस वर्ज्य करावे. बैल, घोडा, हत्ती, उंट यांच्यावर बसू नये. पायात पादुका वापरू नये. अभ्यंगस्नान, आंबट, खारट, तिखट, रेचक अतिसेवन वर्ज्य करावे. नित्य नियमित आहार, नित्य विद्याग्रहण करावे. सुशील, मितभाषी, सभ्य व्हावे. हा मेखला दंड धारण करून भिक्षा मागावी. बटूने आचार्यांना ॐ बाढ (होय) असे प्रत्युत्तर दयावे.

नंतर स्विष्ट कृतादि होमाचा समारोप करावा. तो अग्नी मेधाजननापर्यंत रक्षण



करावा. त्याच अग्नीवर सकाळ व संध्याकाळचे अग्निकार्य करावे. अनुप्रवचनीय होम व ब्राह्मणभोजन याला पुरेल इतकी तांदुळाची भिक्षा मागावी. भिक्षापात्र घेऊन आई-वडील, बहिण व अन्य सुवासिनीजवळ "ॐ भवति भिक्षां दे हि" हा मंत्र म्हणावा. नंतर ती सर्व भिक्षा आचार्यांचे स्वाधीन करावी. अनुप्रवचनीय होम गुरुंच्या सांगण्याप्रमाणे वागण्याच्या उद्देशाने करावयाचा. सकाळच्याच अग्नीवर हा होम संध्याकाळी करावा. त्याच अग्नीवर भात शिजवून सदसस्पती, सविता व ऋषी यांना प्रत्येकी भाताची आहुती दयावी. आहुती देऊन उरलेला भात ब्राह्मणाला दयावा. होम संपवावा.

मेधा जनन विधि (पळसुला) - चौथ्या दिवशी आचार्यांनी घराच्या ईशान्येस १२ अंगुळे विस्तीर्ण अशी तीन पायऱ्यांची वेदी तयार करावी. त्यात पळसाची लहान फांदी डहाळी पानांसह रोवावी. ती न मिळाल्यास, मुळासकट दर्भ घ्यावेत. आचार्यांनी आचमन, प्राणायाम, देशकाळाचा उच्चार करून वेद ग्रहण करण्याचे सामर्थ्य येईल, अशी बुध्दी प्राप्त होण्याकरिता, परमेश्वर प्राप्तीकरिता मेधा जनन करतो असा संकल्प करावा. नंतर "मेधायै" नमः या मंत्राने आवाहनादि सर्व पूजा करावी. जवस, सातूमिश्रित अन्न, मोदक यांचा नैवेद्य दाखवून दूध, पाणी त्या देवतेवरव पळसावर सिंचन करून तीन प्रदक्षिणा कराव्यात. त्यावेळी "सुश्रव भूयांस" हा मंत्र म्हणून नमस्कार करावा. नंतर बटूने स्नान करून यज्ञोपवीत अजिन, दंड, मेखला नवीन धारण करावेत. पूर्वीच्या पळसाच्या शाखेजवळ सोडावीत. वस्त्रे गुरुंना दयावीत. ब्राह्मणांनी मेधासूक्त म्हणावे. नंतर पुण्याहवाचनादि, ब्राह्मण आशिर्वाद, दक्षिणा, भोजनादि होम समाप्त करून करावे. नंतर मंडप देवतांचे उत्थापन सम दिवशी किंवा ५ व्या, ७ व्या दिवशी करावे. सहावा दिवस वर्ज्य आहे. येथे उपनयन विधि संपूर्ण झाला.

उपनयनविधिच्या नंतर करावयाचा संस्कार हा आजच्या काळाला धरून नाही; कारण गुरूगृही जाणे ही कल्पना कालबाह्य झालेली आहे. त्याचप्रमाणे वेदांचा अभ्यास करणे हे सुध्दा बटूच्या ह्या वयात आता शक्य नाही. परंतु शास्त्रामध्ये जे सांगितले आहे, ते खाली विशद केले आहे -

मुंज आठव्या वर्षी झाल्यास पुढील पाच वर्षे वेदांचा अभ्यास किंवा किमान पक्षी वेदांच्या एखादया शाखेचे तरी अध्ययन करावयाचे असते. हे अध्ययन जर तीन वर्षात संपले तर गुरुंना १ गाय व १ बैल दक्षिणा म्हणून देतात. वेदाच्या अध्ययनास पूर्ण ५ वर्षे घेतल्यास, तेराव्या वर्षी चार व्रते केली जातात. ती व्रते म्हणजे महानाम्नीव्रत, महाव्रत, उपनिषदव्रत व गोदानव्रत ही होत. हे संस्कार करता न आल्यास प्रत्येक व्रताबद्दल एक कृच्छ्र किंवा गायत्री मंत्राच्या शंभर गाईच्या तूपाच्या आहुती गायत्री मंत्र म्हणून देतात. (तसे पहाता, उपनयन संस्कारानंतर बारा वर्षे अध्ययन करावयाचे असते व त्यानंतर समावर्तन संस्कार म्हणजेच सोडमुंज केली जाते.)

## सोडमुंज

वरील कथनावरून हे लक्षात येईल की, सोडमुंज ही वस्तुतः गृहस्थाश्रम स्विकारण्यासाठी, अनुरुप वधूची योजना केल्यानंतर करावयाची असते. परंतु सध्या मात्र उपनयन विधीपासून सोळा दिवसांचे आत सोडमुंज केली जाते. ती करण्याचा मुख्य उद्देश म्हणजे मुंजीनंतर प्रगल्भ झालेली बुध्दी कुमार्गाला लागू नये, ही आहे. शास्त्राप्रमाणे सोडमुंज खालीलप्रमाणे होते -

वेदांचे अध्ययन पूर्ण झाल्यानंतर गुरुची आज्ञा घेऊन स्नान करावे. त्यानंतर समावर्तन प्रयोग करावा. सम म्हणजे पूर्ण किंवा उत्तम व आवर्तन म्हणजे निवृत्त होणे, समाप्त करणे. ब्रह्मचाऱ्याने यथोक्त किंवा विद्याभ्यास पूर्ण केल्यानंतर गुरु, माता-पिता यांच्या संमतीने गृहस्थाश्रम स्विकारण्यासाठी स्वानुरुप वधूची योजना केल्यानंतर समावर्तन संस्कार करावा. गृहस्थाश्रमासारख्या सर्व लोकोपकारक आश्रमाचे महत्त्व मनावर ठसावे व आश्रमाच्या कर्तव्यात आपल्या हातून कुचराई होऊ नये, म्हणून या संस्काराचे महत्त्व आहे. समावर्तन संस्कार हा उपनयनास सांगितलेल्याच मुहूर्तावर करावे असे जरी असले तरी मार्गशीर्ष महिन्यात विवाह असतात. दक्षिणायनात सुध्दा समावर्तन करावे. कारण मनुष्याने आश्रमाशिवाय एक दिवसही राहू नये, असा दक्षस्मृती ग्रंथात निषेध आहे. ब्रह्मचर्य दशेमध्ये दशाहाशौच (१० दिवसांचे) धरण्यास कारण की, कोणी मृत असल्यास सोडमुंज झाल्यावर तीन दिवस अशौच पाळावे. समावर्तन संस्कार संकल्प ब्रह्मचाऱ्याने आपल्या रोजच्या नित्यक्रिया केल्यानंतर आचमनादि, देशकाळाचा उच्चार करून गृहस्थाश्रमाच्या प्राप्तीकरिता 'श्रीपरमेश्वर प्रित्यर्थ समावर्तन संस्काराख्यं कर्म करिष्ये।' असा संकल्प करावा. नंतर ग. पू. पुण्याह ना.श्रा. गणपतीपूजन, पुण्याहवाचन, नांदीश्राध्द करून प्रातःकाळी ईशान्य दिशेस असलेल्या उंबर अथवा पिंपळाची एक समिध आणून स्थंडिलाजवळ एका पानावर ठेवावी. संपूर्ण पुढील संस्कार चौल संस्काराप्रमाणेच करावा. इथे 'केश' याऐवजी 'श्मश्रू' शब्द वापरावा. नापिताला बोलावून श्मश्रू, लोम, नखे हे सर्व नापिताने कुशलतेने काढावेत. नंतर ब्रह्मचाऱ्याने करंजबीजाच्या पिष्टाने शरीरास चोळून उनपाण्याने स्नान करावे. नंतर दोन वेळा आचमन करून, पुन्हा अग्नीजवळ जाऊन "युवं वस्त्राणि" या मंत्राने "वस्त्र नेसावे," वस्त्र पांघरावे, आचमन करावे. 'अश्मना तेजोसी' म्हणून दोन्ही डोळ्यामध्ये काजळ घालावे. नंतर कानांत कुंडले घालावीत, कुंकुमतिलक लावावा. 'अनार्तास्य' या मंत्राने मुंडावळ बांधावी 'देवानां प्रतिष्ठे' या मंत्राने पायतण (जोडा) घालावा. 'ॐ दिवश्छद्रमम्' या मंत्राने छत्री धरावी. 'वेणुरसी' या मंत्राने बांबूचा दंड घ्यावा. 'आयुष्यं वर्चस्व' या मंत्राने या सुवर्णमणी बांधावा, नंतर पागोटे उजवीकडून गुंडाळावे. नंतर पूर्वी आणलेली समिधा घेऊन उभे राहून "स्मृत च मे" इत्यादी 'स्वाहा' पर्यंत सर्व मंत्र म्हणून खाली बसून 'ममाग्ने' या मंत्राने दहा समिधा प्रत्येक मंत्राला एक याप्रमाणे अग्नीवर द्याव्यात. "स्विष्टकृतादि" होम समाप्त करून प्राणसंशयाची कोणतीही कामे यापुढे करणार नाही असे म्हणावे. यानंतर करगोटा व लंगोटीचा त्याग करावा.



## ११. विवाह संस्कार

आयुष्यात करावयाच्या संस्कारातील अत्यंत महत्त्वाचा संस्कार म्हणजे विवाह संस्कार होय. उत्तम प्रजा निर्माण करणे, हाच विवाह संस्काराचा मुख्य उद्देश आहे, परंतु एवढाचा उद्देश आहे असे म्हणणे चूक होईल. गृहस्थाश्रमांतील कालक्रमणा उत्तम होण्यासाठी संस्कारपूर्वक विवाह होणे महत्त्वाचे आहे. विवाह करणाऱ्यांनी, विवाहा आधी हा संस्कार जरुर वाचावा म्हणजे गुरुजी करत असलेल्या प्रत्येक विधीचा अर्थ सुध्दा वधु-वरांच्या लक्षात येईल.

आश्वलायन गृह्यसूत्रांच्या मते विवाह खालील आठ प्रकारचे असतात-

१) ब्रह्मविवाह अर्थात वधूपित्याने वराला वस्त्रालंकारभूषित कन्या विधीपूर्वक देणे.
२) दैव विवाह अर्थातच ब्राह्मणाला (ऋत्वीजाला) यथाशक्ती अलंकारभूषित कन्या देणे.
३) प्राजापत्य विवाह अर्थात वधू पित्यानी 'मी फक्त श्रीफळ व कन्या देऊ शकतो' अशा बोलीने धर्मानिष्ठपणे रहाण्याचे आवाहन करून कन्या देणे.
४) आर्ष विवाह अर्थात वधू पित्याने वराकडून धेनू व अश्व घेऊन त्याबदली कन्या देणे.
५) गांधर्व विवाह अर्थात हा विवाह नसून प्रेमात पडलेल्या स्त्री पुरुषांनी आजन्म पती-पत्नी धर्माने एकत्र रहाण्याचे स्वतःच ठरवणे.
६) असुर विवाह अर्थात वधू पित्याला त्याच्या इच्छेप्रमाणे धन देऊन वधू प्राप्त करणे.
७) पैशाच विवाह अर्थात वधूपिता बेसावध असताना कन्येचे अपहरण करून तिच्याशी विवाह करणे.
८) राक्षस विवाह अर्थात कन्या, तिचे आप्त, तिचा पिता ह्या सर्वांचा विरोध असता कन्या पित्यासमक्ष हिंसाचार करून कन्येचे अपहरण करून जबरदस्तीने विवाह करणे.

वरील विवाह प्रकारांपैकी ब्राह्म विवाह हा सर्वात श्रेष्ठ असून राक्षस विवाह हा सर्वात कनिष्ठ आहे. पहिले चार प्रकारचे विवाह यथाविधी केले जातात. आजच्या काळात ब्राह्मविवाह विधिपूर्वक केला जातो.

विवाहपूर्व घेण्याच्या काळज्या खालीलप्रमाणे आहेत-

धर्मशास्त्राप्रमाणे विवाहासाठी स्त्रीचे वय ती रजस्वला योग्य झाली की होते. पुरूषाचे वय पुरुषत्व प्राप्त झाल्यावर होते. ह्या मापदंडाने स्त्रीचे वय १२-१३ व पुरुषाचे १५-१६ होते. वैद्यकशास्त्राप्रमाणे हिच वये १६ व २५ अशी आहेत. कायद्याप्रमाणे मुलीचे वय कमीत-कमी १८ वर्षे व मुलाचे वय कमीत-कमी २१ वर्षे असावे लागते. अर्थात कायदापालन करणे हे आपले प्राथमिक कर्तव्य ठरते.

मावशीची मुलगी, सावत्र आईची बहिण, सावत्र आईच्या पहिल्या लग्नापासून झालेली मुलगी, चुलतीची बहिण तसेच चुलत बहिण यांच्याशी लग्न करणे निषिद्ध आहे. त्याचप्रमाणे भावाच्या बायकोची बहिण (वहिनीची बहिण) अथवा मावशीशी विवाह केल्यास त्यास विरुद्ध संबंध म्हणतात.

वधूवरांची कुळे जेवढी दूर असतील, तेवढे चांगले म्हणूनच सगोत्र विवाह अनुकूल नसतो. परंतु पित्याकडून सात व मातेकडून पाच पिढ्यांर्यत वधूवरांत नाते नसेल तर सगोत्र विवाह सुध्दा चालतो.

स्मृतीवचनाप्रमाणे वधू सवर्णा म्हणजेच समान वर्णाची असावी. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण असून त्या-त्या वर्णाचे वधू-वर असणे, शास्त्रसंमत आहे. वर्णांमधील शाखा अथवा उपशाखा बघण्याची गरज नाही.

वधूवरांचे गोत्र जमत असल्यास, मुलामुलींची पत्रिका पहावी. पत्रिका जुळणे म्हणजे अठरा ते छत्तीस गुण जमणे ही गैर समजूत आहे. अठरा किंवा त्यापेक्षा अधिक गुण जमणे ही मूलभूत गरज आहे, पण त्याचप्रमाणे ग्रहबल बघणे सुध्दा तितकेच आवश्यक असून अधिकारी व्यक्तीचा सल्ला घेणे आवश्यक आहे. देव आणि पितर यांच्या ऋणातून मुक्त होणे हा विवाह संस्काराचा मुख्य उद्देश असल्याने जन्मपत्रिका त्या दृष्टीने अनुकूल आहेत किंवा कसे, हे बघणे तितकेच गरजेचे आहे.

स्त्रियांना गुरुबल श्रेष्ठ व पुरुषांना रविबल श्रेष्ठ. पुरुष व स्त्री या दोघांना चंद्रबल श्रेष्ठ होय. विवाहसमयी गोचरीचा जन्मस्थ तिसरा, दहावा, सहावा गुरु असता बृहस्पती, शांती करून कार्य करावे. चौथा, आठवा, बारावा असल्यास मृत्युकारक असल्याने कार्य करू नये असा याज्ञवल्क्य यांचा विचार आहे, कन्यादानाचे अधिकारी-वडील, आजोबा, भाऊ, काका, स्वगोत्रातील चुलतबंधू, गुरु, मातोश्रीचा पिता, भाऊ, त्यांचेच आप्त हे आहेत. रत्नकोश ग्रंथाप्रमाणे जन्मनक्षत्रावर, जन्मदिवशी, जन्म मासात शुभ कार्य करू नये. ज्येष्ठ मुलगा, ज्येष्ठ मुलगी, ज्येष्ठ महिना मंगल कार्यास वर्ज्य होय; पण ज्येष्ठ महिन्यात वर अथवा वधूपैकी एक ज्येष्ठ असल्यास मंगलकार्य करावे.

आता आपण विवाह संस्काराकडे वळू. ह्यात सांगितलेले काही विधी विवाहा आधी, काही विवाह संस्कार चालू असताना तर काही विधी विवाहानंतर करतात. ते सर्व विधी आश्वलायन गृह्यसूत्र व गृह्यपरिशिष्टांत सांगितले असून वर सांगितलेल्या पहिल्या चार प्रकारच्या विवाह पध्दतीत आवश्यक आहेत.

१) तिथी निश्चय -

वधू-वरांनी एकमेकांना पसंत केल्यानंतरचा सर्व प्रथम विवाहपूर्व विधी म्हणजे तिथी निश्चय होय. ह्या विधीत अधिकारी व्यक्तीला वधू-वरांच्या कुंडल्या दाखवून, दोघांनाही लाभेल असा शुभदिवस व शुभवेळ काढावी.

२) अक्षता देणे -

वरीलप्रमाणे तिथी निश्चित झाल्यावर सर्वप्रथम ही बातमी आपल्या कुलदैवतांस व इतर देवदेवतांस सांगणे शास्त्राला धरून आहे. म्हणून एका कागदावर आमंत्रण पत्रिका लिहून, घरातील देवासमोर त्याचे वाचन करून, देवांना अक्षता देऊन, लग्नाचे आमंत्रण द्यावे.



३) साखरपुडा -

हा विधी शास्त्रसंमत नाही. पूर्वी विवाह हा पंचायतीसमोर नक्की केला जात असे व त्यामुळे विवाह मोडण्याचे विशेष प्रसंग उद्‌भवत नसत. तसाच कांहीसा प्रकार सध्या साखरपुडा ह्या विधीत होतो. आमंत्रित लोकांसमोर कन्येला वरपक्षाकडून साखरेचा पुडा दिला जातो व लग्न नक्की झाल्याचे येथे ठरते. त्यावेळेस कलश स्थापना, गणपती व वरूण देवतांची स्थापना करून, गुरुजी षोडशोपचारे पूजा करतात. त्यानंतर मुलीचे व मुलाचे वडील एकमेकांस कुंकवाचा टिळा लावून एकप्रकारे लग्न ठरल्याबद्दल शिक्कामोर्तब करतात. ह्या विधीला शास्त्राचा मात्र आधार नसून केवळ लग्न नक्की करण्याचा एक समारंभ एवढेच ह्याकडे पहावे.

४) कुंकूमपत्रिका देणे -

सर्व आप्तेष्टांना आमंत्रण केल्यावर विवाहाच्या एक दिवस आधी, ग्रामदेवता तसेच त्याच गावातील गणेशाला आमंत्रित करावे. आप्तेष्टांच्या तीन-चार जणांच्या पत्रिका ह्याच दिवशी देतात.

५) सीमांत पूजन -

**पूर्वीच्या काळचे स्वरुप -**

पूर्वी वधूपिता सर्व तयारीसह गावाच्या सीमेवर जाऊन वरपक्षाच्या आगमनाची वाट पहात थांबत असे. वरपक्ष मंडळी येताच, वराचे पाय धुवून, वरपक्षियांना व वराला वस्त्रभूषणे देऊन त्यांचा सत्कार करीत. हे वराचे पूजन गावाच्या सीमेवर होत असल्यामुळे त्याला सीमांतपूजन असे म्हणत. ह्याच वेळीस व्याहीभेट म्हणजे परस्पर घराण्यांतील पुरुषांची ओळख करून देण्याचा हा सर्व विधी असे. त्यानंतर वधूपिता परत स्वग्रही जाऊन,वर गावांत त्याची व्यवस्था जेथे केली असेल तेथे जात असे.

**सध्याचे स्वरुप**

गावाच्या सीमेवर करावयाच्या ह्या विधीचे स्वरुप संपूर्णपणे बदललेले आहे. सध्या हा विधी मंगल कार्यालयात विवाहाच्या आदल्या दिवशी केला जातो. शिरस्त्राण व मुंडावळ्या बांधलेल्या अशा वराचा उजवा हात धरून, त्याला सुशोभित अशा चौरंगावर बसवावे. कन्येच्या पित्याने "कन्येच्या विवाह अंगभूत असलेल्या सीमांतपूजन हा विधी मी करतो" असा संकल्प सोडावा. त्यानंतर गणेशपूजन, वरूणपूजन, ज्येष्ठ जामातपूजन (असल्यास), वर पुरोहित पूजन करून वराचे पाय धुवावे. त्याला वधुपक्षाने मुंडावळ, पोषाख, वरदक्षिणा (हुंडा नव्हे), हार, नैवेद्य देऊन, पाच सुवासिनींनी ओवाळावे. वराकडील जेष्ठ मंडळी व सुवासिनींचा सत्कार करावा. व्याही ओळख (व्याही भेट) करून घ्यावी. त्यानंतर वधुपक्षाने वरपक्षियांना कढी-भाताचे जेवण द्यावे. वास्तविक पाहता वर व वधु ह्यांनी त्यांच्या मातापित्यासह कार्यालयात रहाणे, आवश्यक आहे; परंतु हल्ली मात्र वधु-वर आपापल्या घरी प्रस्थान करतात व त्यांचे आप्तेष्ट मात्र हॉलवर रहातात. वधु-वर घरी जाण्यापूर्वी वाङनिश्चय केला जातो.

६) वाग्दान विधी -

वाग्दान विधी म्हणजे वधु व वराच्या पालकांनी विवाह ठरल्याबद्दलचा बोलून केलेला ठराव होय. पूर्वी हा विधी लग्नाच्या बरेच दिवस आधी करीत असत; परंतु सध्या मात्र हा विधी सीमांतपूजनाच्या दिवशीच करतात. आठ प्रकारच्या विवाहांमध्ये ब्राह्मविवाह हा मुख्य आहे. वाक्वाणीने दान देणे, हा विधी आश्वलायन, गृह्यसूत्र व गृह्यपरिशिष्टांत सांगितला आहे. उत्तम पोषाख केलेल्या, उत्तम अलंकार घातलेल्या कन्येला पूर्वेस तोंड करून सुशोभित अशा उच्चासनावर बसवावे. तिच्या हातात नारळ विडा द्यावा. कन्या पक्षीयांच्या समक्ष वरपक्षीयांनी पूर्वेस अथवा पश्चिमेस तोंड करून गणपती, कुलस्वामी यांचे स्मरण करून अमुक प्रवरयुक्त, अमुक गोत्रामध्ये उत्पन्न झालेल्या पणतू, नातू, पुत्रवर, अमुक प्रवर असलेली पणती, नात, कन्या, अमुक नावाच्या कन्येला भार्या होण्याकरिता मागत आहोत, असे बोलावे. पुन्हा अशी दोन वेळा वरपित्याने मागणी करावी. कन्यापित्याने देतो असे तीन वेळा दोन्ही हात वर करून सांगावे. नंतर वराचा पिता इत्यादिकांनी गंधाक्षता, हळद-कुंकू, दोन वस्त्रे (साडी चोळी), अलंकार, तांबुल पुष्प, शर्करा इत्यादिकांनी कन्येची पूजा करावी. नंतर कन्यापिता व वरपिता ह्या दोघांनी अनुक्रमे वाग्दान व कन्या निरीक्षण करतो, असा संकल्प सोडून गणपती, वरूण पूजन करून, पुन्हा ४ पिढ्यांचा उल्लेख करून परस्पर परस्परांच्या उपवस्त्रांत बांधाव्या. त्याची गंधाक्षताने पूजा करावी. (ह्यालाच पूर्वी साक्षी विडे म्हणत असत. हे साक्षी विडे झोळीत घालून गावचे अथवा आळीचे ज्येष्ठ पंच यांना या विवाह प्रतिज्ञेचे साक्षीदार म्हणून देत असत.)

उन्नत, उपजीविकेचे साधन नसलेला, अपस्मार, दूरवासी, कुष्ठी, मूर्ख, मोक्षमार्गी, शूर, अविद्या, विवाहाविषयी पराङमुख, षंढ, जातीभ्रष्ट अशा १० प्रकारच्या दोषांनी रहित असलेल्या ह्या वराला ही कन्या देव, अग्नी, ब्राह्मण यांच्या साक्षीने देईन, असे कन्यापित्याने सांगितल्यावर वरपिता कन्यापित्याला विवाहसंबंधी निश्चयाचा शब्द देतो. नंतर कन्यादात्याने पात्रांत धुतलेल्या तांदळाच्या राशीवर शची देवतेचे आवाहन करून पंचोपचार पूजा करावी. कन्येने पण गंधाक्षता, फूल वाहून, "देवेंद्राणी, हे देवी इंद्राणी, इंद्राची प्रिय असणारी पत्नी, मी तुला नमस्कार करते, कारण विवाहभाग्य, आरोग्य आणि पुत्रलाभ मला होऊ दे." येथे मुहूर्तपत्रिका पूजन होते. नंतर मुलाकडील ५ सुवासिनी तिची ओटी भरतात. तैल धृतदीप ओवाळतात. नंतर ब्राह्मणांची गंध, तांबुल देऊन पूजा करतात. ते ब्राह्मण हिकृंण्वती इत्यादी सहा मंत्र म्हणून कन्येच्या मस्तकावर अक्षता टाकतात.

७) तैल हरिद्रारोपण व मंडपदेवता प्रतिष्ठापना

तेल, हळद लावून स्नान करणे, ह्या विधीला तैल हरिद्रारोपण विधी असे नाव आहे. वास्तविक पाहता, हा विधी वर त्याच्या घरी व वधू तिच्या घरी करतात. आई व वडील मंगलस्नान करतात. कुटलेली हळद तेलामध्ये मिसळून प्रथम कन्येला लावतात व तीच हळद वराला उष्टी हळद म्हणून लावतात. ही हळद नागवेलीच्या अथवा आंब्याच्या पानांच्या टोकांनी पायांपासून मस्तकांपर्यंत लावतात. ह्यानंतर माता-पिता व वधु-वरांनी



मंगल स्नान करून, मंगलवेष धारण करून, वधु-वरांना मुंडावळ बांधून, शुभासनावर बसवून, कपाळी मंगल तिलक करावा. मंडपदेवतेचे प्रतिष्ठापन करण्याआधी, कन्येवर जर गर्भाधान वगैरे संस्कार झाले नसतील तर द्रव्यदान देण्याचा संकल्प करावा. हा संकल्प करणे, आवश्यक आहे, कारण संस्कार करावयाचे राहिले असल्यास, रज व वीर्य ह्यात दोष निर्माण होतो. मंडपातील कार्ये निर्विघ्न पार पडावीत, म्हणून मंडपदेवतांची स्थापना करून पूजा करतात. पण वाचकांनी हे लक्षांत घ्यावे की, हल्ली विवाहाचे बहुतेक विधी हॉलवरच होत असतात.

८) हॉलवर पार पाडण्याचे विधी -

पूर्वी वराने वधूच्या घरी जाण्याचा विधी करत असत; परंतु हल्ली मात्र हॉलवरच सर्व विधी होतात. वराकडील मंडळीचे आगमन होण्याच्या सुमारे तासभर आधी वधुपक्षांकडील प्रमुख मंडळी हॉलवर दाखल होतात. ह्यामध्ये कमीत-कमी वधु स्वतः तिचे माता-पिता, करवली व वधुच्या आत्याचा समावेश असतो. वराकडील मंडळी जेव्हा हॉलवर येतात, तेव्हा हॉलच्या दारातच त्यांना थांबवून वधुची आई वराला औक्षण करते. वराच्या बरोबर असलेल्या मंडळीचे सुध्दा कुंकूमतिलक लावून स्वागत केले जाते. त्यानंतर वराने, त्याच्या पित्याने तसेच त्याच्या आईने स्वच्छ वस्त्रे परिधान करावीत. वराला टोपी घालून अलंकृत केलेल्या मुंडावळ्या बांधाव्यात. तसेच वधुस स्वच्छ वस्त्र नेसवून, शाल पांघरून, अलंकार घालून, मुंडावळ्या बांधून तिच्या आईवडिलांसह पुरोहितांनी जिथे लग्नाच्या विधीसाठी तयारी केली असेल तिथे वरासह जावे. मुंडावळ्या ह्या खरं तर शुध्द मोत्याच्या असाव्यात. मुंडावळ्या बांधणे, हे वराला सुशोभित करण्यासाठी आहे, अशी गैर समजूत आहे. शुध्द मोती हे मनाला शांती देणारे आहेत. त्यांची मुंडावळ बांधल्यास मेंदूस वैचारिक व बौध्दिक शांतता प्राप्त होते. तसेच ज्ञानचक्षु स्थिर राहून वैवाहिक जीवनांत योग्य विचार करण्याची शक्ती येते.

वराकडील व वधूकडील पुरोहित वेगवेगळे असून, त्यांनी दोन वेगवेगळ्या पूजा मांडलेल्या असतात. वधू, तिचे आई-वडील ह्यांनी त्यांच्या पुरोहिताकडे तसेच वर, त्याचे आई-वडील ह्यांनी त्यांच्या पुरोहितांकडे आसनस्थ व्हावे. पाटावर एक सलग अशी शाल टाकावी. शाल टाकण्यामागचा उद्देश आसन एकसंघ असावे, असा आहे. दोन्ही पक्षांकडील सुवासिनींनी (शक्यतो आत्या) लग्नकार्यास बसलेल्यांना पुरोहितांसह कुंकूमतिलक करावा. ह्यानंतर पुरोहित वर आणि वधू, त्यांचे आई-वडील ह्यांना कुलदेवतेचे आणि इष्ट देवतांचे स्मरण करून, विड्याच्या पानावर सुपारी, नारळ, दक्षिणा ठेवण्यास सांगतात. तसेच जेष्ठांना वंदन करून, त्यांचे पण आशिर्वाद घेऊन परत सर्व मंडळी स्थानापन्न होतात. ह्यानंतर कन्यापित्याने आचमन, प्राणायाम करून, देशकालाचा उच्चार करून, कन्यावृषली दोष जाण्यासाठी त्याचप्रमाणे गर्भाधानविधी केला नसल्यास, त्याचा दोष जाण्यासाठी द्रव्यदान करावे. ह्या कन्येस, पतीबरोबर धर्मयुक्त प्रजेचे उत्पादन करण्यास, परमेश्वर प्रिती प्राप्त होण्यास, गृह्याग्नी सिध्द होण्यास व धर्माचरणाचा अधिकार प्राप्त होण्यासाठी, विवाह संस्कार कर्म मी करतो, असे कन्येच्या पित्याने म्हणावे.

त्यानंतर वरपित्याने माझ्या पुत्राच्या, देव, पितर आदि ऋणांच्या परिहारासाठी तसेच धर्माचरणाचा अधिकार प्राप्त होण्यासाठी, प्रजोत्पत्तीसाठी, परमेश्वर प्राप्तीसाठी, मी विवाह संस्कार करतो, असे म्हणावे. पितृऋण, देवऋण व ऋषीऋण अशा तीन ऋणांतून मुक्त होण्यासाठी हा संकल्प आहे. (जर एखादा ग्रह वधू अथवा वर व त्यांच्या आईवडिलांना प्रतिकूल असेल तर विवाहपूर्वी चार-पाच दिवस अथवा आठ दिवस आधी करावा.)

त्यानंतर दोन्हीकडील पुरोहित गणेशपूजन, स्वस्तिपुण्याह वाचन व नांदीश्राध्द करतात.

गणेशपूजन तांदळावर सुपारी ठेवून करतात, कारण सुपारी शंकूसारखी (पिरॅमिड) असल्याने, आवाहन केलेल्या देवतेची शक्ती त्यात त्वरीत येते. प्रत्येक धार्मिक विधी करताना वधू व वराच्या मातापित्याने हे लक्षात ठेवावे की, स्त्रीने पुरुषाच्या उजव्या हातास बसून आपल्या उजव्या हाताचा स्पर्श करावयाचा असतो. ह्याचे कारण पुरुषाचे उजवे अंग व स्त्रीचे डावे अंग शुध्द असते. स्त्रीने हस्तस्पर्श केल्यामुळे ती दोन्ही अंगाने शुध्द होते. विधी करताना एकाग्रता येण्यासाठी सुध्दा हाताला हात लावावयाचा असतो.

पुण्याहवाचन करणे म्हणजेच धरतीवरील व पावसातील अशा दोन जलदेवतेचे म्हणजे दोन वरूणांचे पूजन करणे होय. हे पूजन करण्याचे मुख्य कारण मनुष्याचा जन्म जलातच होतो. जलामुळेच तो जीवन जगतो व जलातच त्याचे विसर्जन होते. पुण्याहवाचनांत दोन वरूणांना बोलवितात, म्हणून दोन कलश पाण्याने भरून घ्यावे. त्यामध्ये द्रव्य, औषधी वनस्पती व पाच प्रकारची पाने (आंबा, वड, पिंपळ, उंबर, पायरी) घालून, त्यावर नारळ अथवा वाटीत तांदूळ घेऊन, त्यात सुपारी ठेवून जलदेवतेचे पूजन करावे.

गणेशपूजन व स्वस्तिपुण्याहवाचन पूर्ण झाले.

गणेशपूजन व वरूणपूजन झाल्यावर पूजा करणाऱ्याने 'कलशस्य मुखे कंठ रुद्र समाश्रिता कुक्षौतु सागरासर्वे समाश्रिताः' ह्या श्लोकांनी कलशाची प्रार्थना करावी व उत्तरेकडील कलशावर (वरूणावर) अक्षता वहाव्यात व मातृदेवो भव, पितृदेवो भव, आचार्यदेवो भव, अतिथीदेवो भव असे म्हणून वरील देवतांचे स्मरण करावे. नंतर दोन्ही गुडघे जमिनीस लावून, दोन्ही हात कमळासारखे करून वर न्यावेत. नंतर पुन्हा पूर्ववत बसून, उत्तरेकडील कलश घेऊन प्रथम वर अथवा वधूच्या कपाळास लावावा. नंतर पत्नीच्या व नंतर स्वतःच्या कपाळास लावावा. प्रत्येक वेळी पुन्हा कलश पाटावर ठेवून पुन्हा तीच क्रिया तीन वेळा करावी. त्यावेळी ब्राह्मणांनी 'एताः सत्या आशिषः संतु' असे म्हणावे. नंतर वर आणि वधू पित्यांनी आपापल्या पुरोहितांची पूजा करावी. त्यावेळी पुरोहितांनी त्यांना आशिर्वाद द्यावेत. नंतर यजमानांनी 'भद्रंकर्णेभिः श्रुणुयां देवा' इत्यादी मंत्र म्हणावे. नंतर यजमानांनी (वरपिता व वधूपिता यांनी) व्रत, नियम, तप, स्वाध्याय, यज्ञ, इंद्रिय, निग्रह, दान यांनी युक्त असलेल्या वरील ब्राह्मणांचे मन प्रसन्न असो, असे म्हणावे. त्यावर ब्राह्मणांनी 'आम्ही प्रसन्न आहोत' असे म्हणावे.

नांदि म्हणजे मांगलिक. अर्थातच नांदिश्राध्द म्हणजे मंगल कार्याला आरंभ



करण्यापूर्वी पितरांना केलेले आवाहन होय. पितर म्हणजे वर व वधू ह्यांचे आजी-आजोबा व ते हयात असल्यास पणजी-पणजोबा होत. आजी-आजोबा म्हणजे वडिलांचे आई-वडिल व आईचे आई-वडिल होत. नांदिश्राध्द करताना प्रत्येक पितरांप्रती दोन ब्राह्मणांना म्हणजेच वर व वधू पक्षांकडून आठ-आठ ब्राह्मणांना भोजन देणे, आवश्यक असते. सध्याच्या काळात सोळा ब्राह्मण मिळणे, हे कठीण असल्याने दोन्ही पक्ष पुरोहितांस दक्षिणा देऊन नांदिश्राध्दाचा संकल्प सोडतात. वरीलप्रमाणे नांदिश्राध्द हा विधी केल्यानंतर पितृगणांचे आशिर्वाद प्राप्त होतात. गणेश व दोन वरूण ह्यांना सुवासिनींनी निरांजनानी ओवाळावे. त्यानंतर वरूण म्हणून ठेवलेल्या कलाशातील पाणी एकत्र करून ते पुरोहितांना द्यावे. त्यानंतर पती-पत्नीनी आपापली जागा बदलावी. त्यानंतर पुरोहित त्यांच्याजवळील पाण्यानी वर, वरपिता, वरमाता, वधू, वधूपिता, वधूमाता ह्यांच्यावर कलशातील पाण्याने अभिषेक करतात. त्याचप्रमाणे वरपिता, वरमाता, वधूपिता, वधूमाता ह्यांच्याकडून कार्यसिध्दीसाठी जर दोष निर्माण झाला असेल तर त्याचे पारिपत्य करण्यासाठी 'शांति अस्तु' असा आशिर्वाद गुरुजीकडून होतात. ह्या संदर्भात गुरुजी खालीलप्रमाणे २२ वचने दोन्ही पक्षांना शांती वगैरे मिळण्यासाठी करतात.

१) शांतिरस्तु (शांती मिळो)
२) पुष्टीरस्तु (स्वास्थ्य मिळो)
३) तुष्टीरस्तु (समाधान मिळो)
४) वृध्दीरस्तु (यश मिळो)
५) अविघ्नमस्तु (निर्विघ्न पार पडो)
६) आयुष्यमस्तु (दिर्घायुषी असो)
७) आरोग्यमस्तु (निरोगी असो)
८) शिवंकर्मास्तु (हातून चांगली कामे घडो)
९) कर्मसमृद्धीरस्तु (हातून चांगली कामे होवोत)
१०) धर्मसमृद्धीरस्तु (हातून धर्मकार्य घडो)
११) वेदसमृद्धीरस्तु (वेदांचे रक्षण होवो)
१२) शास्त्रसमृद्धीरस्तु (शास्त्राचे रक्षण होवो)
१३) पुत्रसमृद्धीरस्तु (पुत्राचे रक्षण होवो)
१४) धनधान्यसमृद्धीरस्तु (धनधान्य विपुल असो)
१५) इष्टसंपदस्तु (इच्छेनुसार घडो)

वरील आशिर्वाद हे वर, वधू व त्यांच्या आईवडिलांसाठी आहेत, पण खालील ७ आशिर्वाद मात्र फक्त कार्य करणाऱ्या वर व वधू यांच्या माता-पित्यांसाठीच आहेत.

१६) सर्वारिष्टनिरसनं अस्तु (सर्व अरिष्टांचा नाश होवो)
१७) यत् पापं तत् प्रतिहतमस्तु ( माझ्या हातून घडलेल्या पापांचा नाश होवो)
१८) यच्छ्रेयस्तदस्तु (मला सुयश प्राप्त होवो)

१९) उत्तरेकर्मणि अविघ्नमस्तु (मी करत असलेल्या कार्यात विघ्न न येवो)

२०) उत्तरोत्तरमहरहरभिवृद्धीरस्तु (उत्तरोत्तर माझ्या हातून शुभ कार्य घडत राहोत)

२१) उत्तरोत्तरः क्रियाः शुभाः शोभनास्संपद्यतां (उत्तरोत्तर केलेल्या कर्मांची शुभ फळे मला मिळोत)

२२) इष्ट कामाः संपद्यतां (मनातील इच्छित कामना शुभ असोत)

यजमानांनी ही वाक्ये म्हणत असताना प्रत्येक वचनानंतर ताम्हणांत पाणी सोडावे. (वरील अनुवाद हा स्वैर आहे)

त्यानंतर 'तिथिकरणमुहूर्त क्षत्रादि ग्रहलग्नादि देवताः प्रीयंताम्' इथपासून 'वास्तुदेवता प्रीयंताम्' इथपर्यंत असलेल्या २६ वाक्यांतील देवता संतुष्ट होण्यासाठी प्रार्थना करावी. त्याचप्रमाणे 'हताब्रह्मद्विषः' इत्यादी सात वाक्ये वरपिता किंवा वधूपिता ह्यांच्या हातून हत्या घडल्या असल्यास पापनिवारण होण्यासाठी म्हणून ताम्हणात पाणी सोडावे.

त्यानंतर 'शुभानिवर्धंता' अशी नऊ वाक्ये म्हणून ताम्हणात पाणी सोडावे. ह्यापुढील सर्व कर्म शुभ, चांगली होवोत, ह्यासाठी ही वाक्ये बोलली जातात.

इथे नांदिश्राध्द हा विधी संपला.

ह्यानंतर रुखवत म्हणून वराकडील मंडळीस, वरासह, अल्पोपहार देतात. ह्यावेळी मुलीची आई वराच्या हातावर शुध्द तुपाची आपोष्णी देते. ह्यामागची भूमिका समजून घेणे आवश्यक आहे. एकदा श्रीविष्णु निद्रा घेत असताना त्यांच्या चरणाजवळ सालंकृत आणि सुस्वरुप अशी लक्ष्मी बसली असताना, मधू नावाचा दैत्य तिला प्राप्त करण्याच्या दृष्टीने विचारू लागला. तेव्हा लक्ष्मीने विष्णूला जागे करून मधूची इच्छा सांगितली. (येथे हे लक्षात घेणे आवश्यक आहे की, वधू ही लक्ष्मीरुपी व वर हा विष्णुरुप असतो.) विष्णूने मधूला सांगितले की असंख्य लोकांनी लक्ष्मीला तऱ्हेतऱ्हेने प्राप्त केले आहे. तेव्हा तू हिचा नाद सोड. वधूमाता ज्यावेळेस वराला खाण्यासाठी काही पदार्थ देईल, तेव्हा मी (म्हणजेच विष्णुरुपी वर) तोंड उघडेन व त्याच वेळेस तू माझ्या हृदयात जाऊन नवीन लक्ष्मीला प्राप्त कर. हे ऐकून मधू आनंदाने निघून गेला. तेव्हा विष्णूने लक्ष्मीला सांगितले की, ज्यावेळेस वर तुपाचे म्हणजेच तेजाचे सेवन करेल, त्याचवेळेस मधू ह्या दैत्याचे विवाहापूर्वीच पारिपत्य होईल. रुखवतामागील कथा अशी आहे.

ह्यानंतरचा विधी म्हणजे 'मधुपर्क विधी' होय.

मधुपर्क म्हणजे मध व दही ह्यांचे एकजीव केलेले मिश्रण होय. ह्या मिश्रणाने केलेले वराचे पूजन म्हणजेच मधुपर्क विधी होय. ही पूजा करण्यासाठी वधूपित्याने चार पात्रे घ्यावीत व त्यातील एक पात्र कांस्यपात्र असावे. सर्व पात्रे स्वच्छ उदकाने भरावीत. एका पात्रातील पाणी पाय धुण्यासाठी, दुसऱ्या पात्रातील पाणी अर्घ्यासाठी, तिसऱ्या पात्रातील पाणी मंत्रयुक्त तीन वेळा आचमनासाठी आणि एका पात्रातील पाणी आठ वेळा आचमनासाठी वापरावे. दही न मिळाल्यास दुध व पाणी घ्यावे. मध न मिळाल्यास गूळ अथवा तूप घ्यावे. पंचवीस दर्भांची टोके खाली करून डावीकडून पीळ घातलेली दोरी



घ्यावी. ह्या दोरीला विष्टर असे नाव आहे. ह्या विष्टरावर वराला बसविले जाते. नंतर कन्यादानात अंतर्भूत अशा मधुपर्काने वराचे पूजन करतो, असे वधूपित्याने म्हणावे. त्यानंतर दर्भासनावर बसलेल्या वराचा प्रथम उजवा व नंतर डावा पाय धुवून पुसावा. त्याला गंध लावून सोवळे व शाल द्यावी. आधीची जानवी न काढता, दोन नवीन जानवी द्यावीत (गृहस्थाश्रमांत चार जानवी घालतात.) आलेल्या बंधूवगैरेंचे पूजन करावे. वर विष्णुस्वरुप असल्याने त्याला गोप्रदान करावे.

ह्यानंतरचा विधी म्हणजे 'गौरीहर पूजन' होय. हा विधी वधूला सौभाग्य प्राप्त होण्यासाठी तसेच शुभ संततीसाठी व धनधान्याच्या समृध्दीसाठी असतो.

ह्या विधीत कन्येला मंगलस्नान घालून, पीत वस्त्र अथवा हळद लावलेले वस्त्र नेसण्यास द्यावे. पीत वस्त्रातील वधूला त्या वस्त्रामुळे कुठल्याही प्रकारची बाधा अथवा दृष्ट लागत नाही. त्यानंतर पाटा व वरवंटा यावर हळदीने गौरी व शंकर यांची प्रतीके काढतात. (हल्लीमात्र गौरीहराऐवजी तांदळावर अन्नपूर्णा व बाळकृष्ण ठेवण्याची प्रथा पडली आहे) ह्या पाट्याला कोरे सूत गुंडाळून गौरीहराची पूजा करून सौभाग्य, शुभ संतती आणि धन-धान्य सिध्दीकरिता संकल्प सोडावा. त्यावेळी वधूनी डाव्या व उजव्या हाताचा अंगठा सोडून बोटांनी ताम्हणातील तांदूळ घेऊन वहावेत. त्यावेळी "हे गौरीहरा मला सौभाग्य दे, मला शुभ संतती दे, धन-धान्य समृध्दी दे" असे म्हणावे. मुहूर्ताचे पूर्वी एक हात अंतरावर पूर्व-पश्चिम समोरासमोर एक शेर पांढऱ्या तांदळाच्या दोन राशी कराव्यात. शेल्याच्या मध्यभागी स्वस्तिक काढून, उत्तरेस दशा करून तो अंतरपाट दोघांनी धरावा. पूर्वेकडे तोंड करून कन्येला उभे करून दोघांच्या हातात जिरे, गूळ, तांदूळ देऊन, अभिष्ट देवतेचे चिंतन करण्यास सांगून ब्राह्मणांनी 'सत्येनोत्तभिता' सूक्त म्हणून अन्यत्रांनी मंगलगीते गावीत, मंगलाष्टके म्हणावीत. शेवटी "तदेव लग्नं" म्हणून अंतरपाट बाजूला करावा. एकमेकांनी, एकमेकांकरिता, अंतःकरण शुध्द, स्वच्छ व निर्मळ ठेवू, अशा भावनेने हे भाव डोळ्यात पहावे व हातातील जिरे वगैरे एकमेकांनी परस्परांच्या डोक्यावर वहावेत. नंतर दर्भाच्या अग्राने कन्येच्या भुवयांच्या मध्यभागास स्पर्श करून तो दर्भ कन्येच्या डोक्यावरून मागे टाकावा. नंतर वरास पूर्वाभिमुख व वधूस पश्चिमाभिमुख बसवून ब्राम्हणांनी आशीर्वाद मंत्र म्हणताना प्रथम वधूकडून नंतर वराकडून एकमेकांच्या मस्तकावर अक्षता घालाव्यात, असे तीन वेळा किंवा पाच वेळा करावे.

त्यानंतरचा विधी म्हणजे 'कन्यादान' होय.

वराचे तोंड पूर्वेस, कन्येचे पश्चिमेस अशी समोरासमोर उभी करून कन्यादात्याने पत्नीसह उत्तरेस तोंड करून बसावे. देशकालाचा उच्चार करावा. "मी माझ्या सर्व पितरांना निरतिशय आनंदाने युक्त अशा ब्रह्मलोक प्राप्तीकरिता ह्या वरापासून कन्येच्या ठिकाणी होणाऱ्या संततीच्या योगाने वडिलांच्या कुळातील बारा आणि पतीच्या कुळातील बारा व माझ्या पंचवीस पिढ्या पवित्र करून, उध्दार करण्याकरिता तसेच लक्ष्मीनारायणाची प्राप्ती होण्याकरिता कन्यादान करतो." असा संकल्प करावा. पत्नीसह उभे राहून, कन्येच्या

उजव्या खांद्यावर हात ठेवून "सुवर्णालंकारांनी युक्त अशी ही कन्या, विष्णु अशा तुला देतो," असे कन्यादान करणाऱ्याने म्हणावे. "ह्या विधीस सर्व जगास व्यापून टाकणाऱ्या परमेश्वरासह, सर्व देवता साक्षी आहेत. ह्यांच्या समक्ष पितरांचा उध्दार व ब्रह्मलोक प्राप्तीकरिता ही कन्या तुला देतो" असे सुध्दा म्हणावे. नंतर प्रथम कन्येने ओंजळ करावी व त्यावर वराने आपली ओंजळ ठेवावी. कन्यापित्याने वराच्या उजव्या हातात पाणी पडेल, अशा पध्दतीने हात त्याच्या हातावर ठेवावा. मातेने संततधार हातावर पडेल, असे पाणी पतीच्या हातावर घालावे. पतीने "ही माझी कन्या श्रीस्वरुपिणी, प्रजापती देवतेची कन्या, प्रजात्पादन करण्याकरिता मी तुला देत आहे," असे म्हणावे. वराने "मी स्वीकार करतो," असे तीन वेळा म्हणावे. नंतर वराने वधूच्या उजव्या खांद्याला स्पर्श करून 'क इदं' हा मंत्र म्हणून धर्म व प्रजासिध्दीकरिता मी ह्या कन्येचा स्वीकार करतो, असे म्हणावे. नंतर कन्यादाता धर्म-अर्थ-काम ह्या तीन गोष्टी करण्याकरिता ही तुला दिली आहे, ह्याचे उल्लंघन होणार नाही, असे वचन वराकडून घेतो. त्यावेळी वर तीन वेळा "नातिचरामि" असे सांगतो. पित्याने पाण्यासह सुवर्णदान, तांब्याचा तांब्या, पंचपात्री, ताट, ताम्हण, समई, काश्याची वाटी व संसारोपयोगी वस्तू द्याव्यात. ह्यालाच आंदण म्हणतात. हा आहेर अथवा भेटवस्तू नाही. कन्यादानाच्या सांगतेकरिता दहा ब्राह्मणांना भोजन घालावे. नंतर वराने यत्कक्षीवासं या मंत्राने, कन्येच्या उजव्या कुशीला हात लावावा. ह्या मंत्राचा अर्थ असा की, अंगिरसाच्या कृपेने ज्याप्रमाणे कक्षीवानाला पुत्र झाला, त्याच कृपेने आम्हाला आवडती संतती होवो. नंतर उपाध्यायाने पूर्वी अभिमंत्रित केलेले पाणी घेऊन त्यात सुवर्ण, दर्भ, दुर्वा, पल्लव घालून उंबराच्या ओल्या डहाळीने वधू-वर यांना अभिषेक करावा.

## सूत्रवेष्टन

नंतर वधूवरांस समोरासमोर बसवून दुधात भिजविलेल्या पांढऱ्या सुताने ईशान्येकडून आरंभ करुन गळ्याभोवती व नंतर कमरेभोवती चार अथवा पाच वेळा "परित्वा" ह्या मंत्राने वेष्टन करावे. ह्यामागचा उद्देश एक प्रकारे आम्ही बध्द असून वेदाज्ञेप्रमाणे संसार करू हे वचन घेण्याचा आहे. कंठाचे सूत्र जमिनीवर ठेवून, कटीसूत्रावर काढावे. नंतर वधूवरांस उठवून, जमिनीवरील सूत्र उचलावे. नंतर त्याला पीळ घालून, पिवळे करून हळकुंड व लोकर बांधून ते सूत्र वराने वधूच्या डाव्या मनगटात 'नीललोहितं' या मंत्राने बांधावे. अभिचाराभिमानी नील व रक्त वर्णाची देवता वधूच्या शरीरात रहाते. तिचा नाश होऊन, स्वजन पती सुखी होऊन संसारात बांधला जातो. नंतर कटी कंबर सूत्र वधूने उजव्या हाताच्या मनगटात बांधावे (कुंभ विवाहात कन्यादान, सूत्रवेष्टन एवढेच असते.) ह्या विधीमुळे वराचे संरक्षण होते.

## अक्षतारोपण

एका पात्रात दूध व तूप एकत्र घ्यावे. दुसऱ्यात ओल्या अक्षता घ्याव्यात. वराने वधूच्या ओंजळीत दूध-तूप दोन वेळा लावावे व दोन वेळा तांदुळ घालावेत. नंतर पुन्हा



दोन वेळा दूध-तूप घालावे. तिची ओंजळ तशीच ठेवावी. त्याचप्रमाणे वराच्या ओंजळीत उपाध्यायाने अक्षता घालाव्यात. वधुच्या ओंजळीवर वराची ओंजळ ठेवून 'कन्यातारयतु' हे सहा मंत्र म्हणून वधूने उठून 'भगो मे कामः समृध्यताम्' हा मंत्र म्हणून वराच्या मस्तकी ओंजळीतील अक्षता वहाव्यात.

नंतर वराने "यज्ञो मे काम समृध्यताम्" हा मंत्र म्हणून वधुच्या मस्तकावर अक्षता वहाव्यात. अशा रितीने दोघांनी पुन्हा दोन वेळा करावे. दुसऱ्या वेळेस वधुने 'श्रियो मे कामः', वराने 'धर्मो मे कामः,' वधुने 'प्रजा मे कामः', वराने 'यशो मे कामः' हा मंत्र म्हणून वधूच्या मस्तकावर अक्षता घालाव्यात. नंतर पूर्वीप्रमाणेच वधूने वराच्या ओंजळीत दूध तूप लावून अक्षता दोन वेळा घालून पुन्हा दोन वेळा दूध तूप लावून नंतर कन्येची ओंजळ दुसऱ्याने भरून त्यात सोने घालून, वराच्या ओंजळीवर कन्येची ओंजळ ठेवून "कन्या तारयुत" हे सहा मंत्र म्हणून, वराने 'यज्ञो मे काम समृध्यताम्' असे म्हणून वधूच्या मस्तकावर अक्षता घालाव्यात. त्याचप्रमाणे वधूने 'भगो मे' वराने 'धर्मो मे', वधूने 'श्रियो मे', वराने 'यशो मे', वधूने 'प्रजा मे' असे म्हणावे. नंतर दोघांच्या ओंजळीत अक्षता भरून, मंत्र न म्हणता एकमेकांनी अक्षता मस्तकावर टाकाव्यात. वराने आपल्या मस्तकावरील एक फूल दुधात बुडवून, कन्येच्या कपाळास तिलक करावा. त्याचप्रमाणे कन्येने करावे. एकमेकांनी आपापले हार बदलून घालावेत. वरील सहा मंत्रांचे अर्थ-

वधू : माझी ऐश्वर्याची इच्छा पूर्ण होवो.
वर : माझी त्यागाची इच्छा पूर्ण होवो.
वधू : माझी संपत्तीची इच्छा पूर्ण होवो.
वर : माझी धर्माची इच्छा पूर्ण होवो.
वधू : माझी प्रजोत्पादनाची इच्छा पूर्ण होवो.
वर : माझी किर्तीची इच्छा पूर्ण होवो.

## मंगलसूत्र बंधन

नंतर वधू व वर यांनी दोन सुपाऱ्यांवर गणपती पूजन (प्रयोगरत्न ग्रंथाप्रमाणे महालक्ष्मी, पार्वती व शची यांचे पूजन) करून काळ्या मण्यांत, सुवर्णमणी वाट्यायुक्त चोवीस इंच लांबीच्या अशा मंगलसूत्राचे पूजन करून, ते मंगलसूत्र पतीने आपल्या हातात घेऊन, 'हे पतिव्रते, हे मंगलसूत्र माझ्या जीवनाचे कारण आहे, म्हणून मी तुझ्या गळ्यात बांधतो, यामुळे तू पण शंभर वर्षांपर्यंत सुखाने रहावे' असे म्हणावे. मंगलसूत्रातील सोन्याच्या पोकळ वाट्या स्त्रीच्या हृदयातील उष्ण ऊर्जा समपातळीवर ठेवतात. तेथील ऊर्जा व दुग्धग्रंथी शुध्द व स्वच्छ ठेवतात. सुवर्ण हे शरीरातील ऊर्जेची क्षमता टिकवून धरते, तसेच वेढी विरवल्या घालतात. त्यांच्या संबंध स्त्रीच्या बीजांडाचे संरक्षण करण्यासाठी असतो. वरमाता वधूला शाल, शेला, अलंकार देऊन ओटी भरते. नंतर दोघांचा शेला, उपरणे, त्यामध्ये गणपतीपैकी एक-एक सुपारी व अक्षता घेऊन गाठ बांधावी. नंतर वधू-वरांनी हात धरून विवाहहोमासाठी जावे.

## विवाह होम

वराने पूर्वेस तोंड करून, आपल्या उजव्या बाजूस पत्नीस बसवून, आचमनादि देशकालाचा उच्चार करून, प्रतिग्रहरुपाने स्विकार केलेल्या वधूस 'भार्यात्त्वसिध्द व गृह्याग्नि सिध्द होण्यासाठी विवाह होम करीन' असा संकल्प करावा. 'अग्न आयुर्षी, अग्निर्ऋषी, अग्नेपवस्व, त्वमर्यमा, प्रजापते' या पाच मंत्रानी तुपाच्या आहुती दयाव्यात.

## पाणिग्रहण

वराने पत्नीच्या पुढे उभे राहून "गृभ्णामिते" या मंत्राने, पत्नीचा उजवा हात, अंगठ्यासह आपल्या उजव्या हाताने धरावा व एकमेकांनी एकमेकांकडे पहावे. नंतर पूर्वस्थानी येऊन, वधूला उठवून, तिचे हात धुवून, तिच्या ओंजळीत तूप घालून, तिच्या भावाकडून सुपातल्या लाह्या तिच्या ओंजळीत दोन वेळा घालाव्यात. त्यावर वराने तूप घालून, उभे राहून आपल्या दोन्ही हातांनी, उभे राहिलेल्या वधूची ओंजळ 'अर्यमणं' या मंत्राने सर्व लाह्या होमात घालाव्यात. नंतर वधूचा हात धरून (उदककुंभ) अग्नीस प्रदक्षिणा करावी. नंतर वधूस दोन्ही पाय पाट्यावर किंवा सहाणेवर ठेवून, पूर्वेस तोंड करून उभे करावे. "इममश्मान" हा मंत्र म्हणावा (अर्थ- हे मुली, तू माझ्यासारखी मनाने व शरीराने घट्ट रहा व जे तुझे अहित करणारे असतील, त्यांना आपल्या सद्वर्तनाने वश करून घे) त्याच पध्दतीने दुसऱ्या वेळी 'वरूणं नु' हा मंत्र म्हणून कृती करावी. तशीच कृती तिसऱ्या वेळी 'पुषणं नु' या मंत्राने करून प्रदक्षिणा करताना 'अमोहमस्मि' हा मंत्र म्हणून नंतर पाट्यावर उभे रहावे. (प्रदक्षिणा करताना मंत्र म्हणतात त्याचा अर्थ- हे स्त्रिये, मी सामवेदस्वरुप आहे. तू ऋग्वेदस्वरुप आहेस. मी आकाशरूप व तू पृथ्वीस्वरुप आहेस. आपण दोघे अग्नी व ब्राम्हण यांच्या साक्षीने विवाह करू. एकमेकांवर निष्कपट प्रेम करून, प्रजा उत्पन्न करून शंभर वर्षे जगू.) भाताच्याच लाह्या का ? तर एक भाताच्या रोपास पाचशे ते सातशे दाणे असतात (बहुप्रसवा). शिवाय एकदल आहे. पिकल्यावर पूर्ण फळे तयार झाल्यावर ते खाली वाकते (नम्र) व सोन्यासारखे दिसते (कांतीमान). म्हणून तू बहुप्रसवा, नम्र व शेवटपर्यंत कांतीमान असावीस, असे म्हणण्याचा उद्देश आहे. नंतर पुन्हा जागेवर बसून, 'प्रजापतये स्वाहा' असे म्हणून, सुपाचे तोंड आपल्याकडे करून, त्यातील लाह्या वराने होमात घालाव्यात.

## सप्तपदी

अग्नीच्या उत्तरेस सात तांदळाच्या राशी घालून, आठव्या राशीवर कलश ठेवावा. प्रथम राशीवर वधूने आपला उजवा पाय ठेवावा. वराने तिच्या मागे येऊन आपला उजव्या पायाचा अंगठा तिच्या उजव्या टाचेला लावावा. आपले दोन्ही हात तिच्या दोन्ही खांद्यावर ठेवावेत. दोघांनी बरोबर चालावे. प्रत्येक पाऊल टाकताना काय म्हणायचे व त्याचा अर्थ खालीलप्रमाणे -

१) इष एकपदीभव - अर्थ - हे वधू, तू माझ्याबरोबर एक पाऊल चाललीस, म्हणून तुझे माझे सख्य झाले, म्हणून तू मला पाकनिष्पत्ती करून, अन्न पुरवणारी, मला अनुकूल होऊन,



आम्हा उभयतांना बहुत पुत्र होऊन, ते शतायुषी होवोत.

२) उर्जेद्वीपदी - अर्थ- हे वधू, तू माझ्याबरोबर दुसरे पाऊल चाललीस, म्हणून तू माझे बल वाढविणारी हो.

३) रायस्पोषाय त्रिपदी-अर्थ- तू तिसरे पाऊल चाललीस, म्हणून तू धन देणारी हो.

४) मायोभव्याय - तू चौथे पाऊल चाललीस, म्हणून तू वैभव वाढविणारी हो.

५) प्रजाभ्य- तू पाचवे पाऊल चाललीस, म्हणून तू संतती वाढवणारी हो.

६) ऋतुभ्य- तू सहावे पाऊल चाललीस, म्हणून तू सर्व ऋतूमध्ये प्राप्त होणारे, ते भोग देणारी हो.

७) सखासप्तपदी- तू माझ्याबरोबर सातवे पाऊल चाललीस, म्हणून तुझे माझ्याशी सख्य, अनिवार्य प्रेम घट्ट झाले. सप्तपदीमुळे स्त्री-पुरुषाचे सख्य किती दृढ होते, हे यावरून समजते.

सप्तपदीच का ? तर भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः व सत्यम अशा सात लोकांपर्यंत मला सौभाग्य देण्यासाठी. सप्तपदी झाल्यावर वधूच्या बहिणीने आपल्या उजव्या हाताच्या अंगठ्याने, वधुच्या उजव्या पायाचा अंगठा दाबावा. माहेरची आठवण विसरू नये, असा याचा लौकिकार्थ आहे. तसेच लाह्या घातल्यावर, कानपिळीचा मान वधूच्या भावाला वराकडून दिला जातो. त्यावेळी वराचा उजवा कान वधूच्या भावाने धरून माझी भगिनी आपणास दिली आहे. तिला नीट सांभाळावी, असे म्हणावे. नंतर वधूने आपल्या भोवती फिरून वराकडे तोंड करावे. दोघांनी कपाळास कपाळ लावावे. (येथे ज्ञानचक्षुंची भेट होते) कलशातील पाणी घेऊन प्रथम स्वतःच्या मस्तकावर 'शांतीरस्तु' असे म्हणून नंतर वधूच्या 'पुष्टिरस्तु' असे म्हणून "इष्टसंपदस्तु" पंधरा मंत्रांनी अभिषेक करावा. नंतर पुन्हा जागेवर बसून, हल्लीच्या पध्दतीप्रमाणे, ग्रह प्रवेशनीय होम त्याच ठिकाणी करतात. व 'स्विष्टकृतादि' होम समाप्त होतो. पूर्वी बांधलेली वस्त्राची गाठ सोडावी. त्यानंतर पती शतायुषी व्हावा, दोघांचे प्रेम अटळ रहावे व संतती प्राप्त होण्यासाठी वराने वधूचा हात धरुन, उत्तर दिशेस ध्रुव, अरुंधती व सप्तऋषी हे तारे वधूस दाखवून 'प्राजांविन्दे' हा मंत्र म्हणावा. नंतर 'समंजंतु' हा मंत्र म्हणून थोडे तूप आपल्या व पत्नीच्या हृदयाला लावावे. होम समाप्त करून ब्राम्हणांकडून आशीर्वाद घ्यावेत. शास्त्रानुसार दोघांनी सात्विक आहार घ्यावा. पण तीन रात्रीपर्यंत ब्रम्हचर्य पाळावे.

ह्यापुढील विधी खरं तर विवाहाच्या चौथ्या दिवशी चालू होतात, परंतु सध्या मात्र हे विधीसुध्दा हॉलवरच होतात. सप्तपदीनंतरची विधी म्हणजे ऐरणीदान विधी. (काही ठिकाणी वसंतपूजन, गजपूजन व नागबलीस्तंभन हे विधी असतात) ऐरणीदान (ह्यालाच 'झाल' असे म्हणण्याची प्रथा आहे) विधीमध्ये कन्यादानाची सांगता व वंशवृध्दी होण्यासाठी ऐरणी पूजन करण्याचा व वरमातेला ऐरिणीदान देण्याचा संकल्प करावा. ह्या विधीला शास्त्रप्रमाण नाही, पण ह्या विधीची शंकर-पार्वती देवता असते. वरमातेला सोळा लहान सुपे व एक मोठी पसरट टोपली तिचे पूजन करून दयावी. त्याचवेळेस मानाच्या अशा

वरपक्षाकडील स्त्रिया व पुरुष यांचे पूजन करावे. स्त्रीमध्ये ऋतू सोळा दिवस असतो, म्हणून सोळा दिवे प्रज्वलित करून, सुपामध्ये देऊन वराकडील ज्येष्ठ जबाबदार व्यक्तींच्या डोक्यावर ठेवावी. आजपर्यंत प्रेमाने सांभाळलेली विनंती वराकडील लोकांना करावी. त्यांचा वस्त्रादी देऊन सन्मान करावा व सूनमुख ह्या संस्काराला वळावे. सूनमुख करण्यामागची भावना अशी आहे की, अलंकृत अशा वधूस दृष्ट लागणे कधीही शक्य आहे. वरमातेची दृष्ट लागण्याची शक्यता गृहीत धरून, वरमातेला सूनेचे मुख आरशात दाखवतात. या विधीत वधूल वरमाता आपल्या मांडीवर बसवून तिचे मुख आरशात पाहून, तिच्या भांगात शेंदूर-कुंकू भरतात. तिला साखर भरवतात.

यानंतर वधुची आई वरास ज्या खोलीत गौरीहर पूजन केले आहे, तेथे घेऊन जाते. नंतर तेथील कलशातील पाणी आंब्याच्या पानाने वधूने स्वतःवर व वरावर उडवावे. ह्यालाच 'आंबा शिंपणे' असे म्हणतात. त्यानंतर वधूची आई, वधूची मालत्यांनी ओटी भरते. नंतर वर-वधूच्या हातावर दही देते. नंतर वराने अन्नपूर्णा व बाळकृष्ण ह्यांना पाट्यावरून उचलून, ज्येष्ठ मंडळींना नमस्कार करून, स्वतःच्या घरी लक्ष्मीपूजन करण्यास प्रस्थान करावे. आधी म्हटल्याप्रमाणे हल्ली लक्ष्मीपूजन सुध्दा वधू-वरांचे कडून हॉलवरच केले जाते. ह्या विधीमध्येच अंतर्भूत असलेला आणखी एक विधी म्हणजे वधूला मुहूर्तमणी बांधण्याचा होय. कांस्यपात्रात तांदुळ घेऊन, सुवर्णाच्या काडीने गणेश व कुलदेवतेचे नाव लिहून, वधूचे वराने नव्याने ठेवलेले नाव लिहावे व नंतर ते कांस्यपात्र उजव्या मांडीवर ठेवून वराने पत्नीच्या उजव्या कानात तिचे नवे नाव सांगून मुहूर्तमणी बांधावा. मग वधू उभी राहून वराचे नाव घेते. आता वर वधूचे नवीन ठेवलेले नाव सर्व लोकांना जाहीर करतो. ब्राम्हणाच्या आशीर्वादानंतर हा कार्यभाग संपन्न होतो. (वास्तविक लक्ष्मीपूजन हे गृहप्रवेशानंतर वराच्या घरी व्हायला पाहिजे, ते ध्यानांत घ्यावे.)

त्यानंतर हॉलवरील शेवटचा विधी म्हणजे हॉलवर स्थापन केलेल्या देवतांचे व मंडपदेवतांचे उत्थापन होय.

## वरगृही करावयाचे विधी

वराच्या घरी महत्त्वाचा विधी म्हणजे गृहप्रवेश होय. हॉलवरील कार्य केव्हाही संपले तरी गृहप्रवेश मात्र गुरुजींनी काढून दिलेल्या शुभ मुहूर्तावर होणे पुढील सुखसमृध्दीसाठी आवश्यक आहे. म्हणूनच ब्राम्हणांकडून दोन किंवा तीन शुभमुहूर्त काढून घ्यावेत. वधू जेव्हा वरातीने वरगृही येते, तेव्हा वराच्या घराच्या उंबरठ्यावर तांदुळ भरुन माप ठेवतात व ते माप वधूने आपल्या उजव्या पायाने तीन वेळा ढकलावयाचे असते. गृहप्रवेश केल्यानंतर इष्टदेवतांना नमस्कार करून, लक्ष्मीपूजन करावे. (हे लक्ष्मीपूजन आपण हॉलवरच केलेले आहे) सर्व उपस्थितांना साखर वगैरे देऊन, विवाह विधी संपन्न झाला, असे समजावे.

कालानुरुप व चित्रपटातील घटना पाहून बरेचसे लौकिक व शास्त्रदृष्ट्या अनावश्यक विधी लोक विवाहात अंतर्भूत करतात. उदा. वराचे रुसणे, पायघड्या घालणे, हळद खेळणे, जोडे लपविणे, सुपाऱ्या लपविणे, वधू-वरांना वर उचलून एकमेकांच्या गळ्यांत हार घालणे, वधूवराने एकच विडा खाणे, झेंडा नाचविणे वगैरे ह्यातील काही विधी विवाह सोहळ्याचे गांभीर्य नष्ट करतात व एकप्रकारच्या पोरकटपणाचे गालबोट समारंभास लागते.

सूज्ञ वाचकांनी शास्त्राधार नसलेले असे विधी करावे की नाही ह्याच्यावर जरुर विचार करावा. विधी म्हणजेच मुख्यतः कन्येचे दान व वराकडून तिचा स्विकार एवढेच आहे, ह्याचा विसर पडू देऊ नये.

## अंत्यसंस्कार

चौऱ्यांशीलक्ष योनी फिरून, पुण्यकर्म केले असल्यास, मनुष्य जन्म प्राप्त होतो. ह्या जन्मानंतर, परमेश्वर प्राप्त होऊन मोक्ष गती प्राप्त होते. म्हणजेच मोक्ष मिळविण्यासाठी मनुष्ययोनीत जन्म व त्यातच अंत होणे आवश्यक आहे. वास्तविक सर्व प्राणीमात्र वासनेतून जन्म घेतात पण मनुष्य हा एकटाच प्राणी असा आहे की जो वासना घेऊनच जगतो व मरताना सुध्दा वासना (इच्छा, भावना) ठेवून मरतो. सद्‌गती मिळवण्यामध्ये उरलेली वासना येऊ शकते म्हणून मोक्ष मिळवण्यासाठी परमेश्वराने दोन गोष्टी इतर योनीपेक्षा मनुष्ययोनीला जास्त दिल्या आहेत तया दोन गोष्टी म्हणजे वाचा व बुध्दी ह्या होत. मनुष्याचा जन्म जरी त्याच्या हातात नसला तरी मोक्ष मिळवण्यासाठी परमेश्वराच्या म्हणण्यानुसार वाचेचा उपयोग त्याच्या नामस्मरणासाठी आणि बुध्दीचा उपयोग सदविचारासाठी करावा. असे केल्यासच हरिचरण प्राप्त होतात.

मोक्षप्राप्तीसाठी जसे हरिनाम व सद्सद्विवेकबुध्दी आवश्यक आहेत, त्याचप्रमाणे मनुष्यदेहातून आत्मा निघून गेल्यानंतर देहाच्या मुक्तीसाठी वैदिक कर्मानुसार किंवा धर्मानुसार खालीलप्रमाणे संस्कार करणे आवश्यक आहे.

मनुष्यदेहातून आत्मा निघून गेल्यावर म्हणजेच त्याचे निष्प्राण शरीर (कलेवर) एक ते दोन घटिकांपेक्षा (अडीच ते पाच तासांपेक्षा) जास्त वेळ ठेवू नये. कलेवर जर जास्त वेळे ठेवले गेले, तर पृथ्वीला भार होतो व ती जागा दग्ध होते. परंतु जर प्राणोत्क्रमण प्रदोष काळानंतर म्हणजेच रात्री आठचे पुढे झाले असेल, तर शास्त्राप्रमाणे प्रेतदहन सूर्योदयानंतर करावे. त्याचप्रमाणे कुटुंबातील अथवा त्यांच्याजवळील कोणीतरी व्यक्तीने गुरुजींकडून प्राणोत्क्रमाणाचे वेळी त्रिपाद किंवा पंचक नक्षत्र आहे किंवा कसे समजून घ्यावे. जर त्रिपाद किंवा पंचक असेल, तर विधींमध्ये फरक पडतो. त्रिपाद किंवा पंचक असल्यास घाबरण्याचे कारण नसून कुठलीही दुर्घटना नजीकच्या काळात घडू नये म्हणून काही विधी करावे लागतात एवढंच. मनुष्य जातेवेळी भुकेला, तहानलेला वगैरे होता का ? हे कळावयास मार्ग नसल्यामुळे, प्रेत स्मशानात नेण्यापूर्वी पाथेय श्राध्द करण्याची पध्दत आहे. परंतु हल्लीमात्र हे श्राध्द दहाव्या दिवशी केले जाते. प्रेताला स्नान घालणे किंवा केवळ पाय धुणे, नवीन वस्त्र घालणे वगैरे पध्दती ठिकठिकाणी वेगवेगळ्या आहेत. कलेवर घराबाहेर नेल्यानंतर आचाराप्रमाणे दहा दिवस तेलाचा दिवा अखंड लावण्याची पध्दत आहे. त्या दीपज्योतीवर आत्मा फिरत असतो, अशी समजूत आहे, म्हणून भोजनापूर्वी त्या दिव्याजवळ भाकरीचे पीठ किंवा शिजलेल्या भाताचे मुटकुळे ठेवण्याची पध्दत आहे.

कलेवर स्मशानाच्या बाहेर खाली ठेवून तिकडील अश्मा (दगड) जीवाश्मा म्हणून घेऊन मगच स्मशानात प्रवेश करावा. प्रेतास अग्नी देण्याआधी करावयाचे विधी गुरुजी ज्याला अंत्यसंस्कार करावयाचे अधिकार आहेत, त्याच्याकडून करवून घेतात.



## अस्थिसंचयन

अस्थिसंचयन हे पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या अथवा सातव्या दिवशी करता येते. अस्थी गोळा करण्याआधी प्रेतदहन केलेल्या ठिकाणी दूध शिंपडून अथवा पंचगव्य (गोमूत्र, गोमय, दूध, दही आणि तूप) शिंपडून खांदा, हात, ढोपा आदि ठिकाणच्या अस्थी गोळा करून घराच्या बाहेर तांब्या, ताम्हण, पळी-भांडे, नेसण्याच्या पंचासह उत्तरीमध्ये बांधून ठेवाव्यात.

संचयन केलेल्या अस्थींचे विसर्जन क्रिया सुरू व्हावयाच्या आधी करावे. गंगेमध्ये विसर्जन केल्यास मनुष्यास पुनर्जन्म नाही, असा समज आहे. अस्थी विसर्जनास शनिवार, रविवार, मंगळवार व अस्थिविसर्जन करणाऱ्याचे जन्मनक्षत्र हे दिवस वर्ज्य आहेत. अस्थिविसर्जन दहा दिवसांत केल्यास गुरु-शुक्राचा अस्त व अधिक मास ह्याचा दोष नाही.

ब्रह्मपुराणात सांगितल्याप्रमाणे प्रतिदिनी एक पिंड ह्याप्रमाणे दहा पिंड प्रेतदहनाच्या दिवसापासूनच करावयास हवेत. ह्यालाच अवयव पिंडदान असे म्हणतात. पण काही ठिकाणी तिसऱ्या, पाचव्या अथवा सातव्या दिवशी क्रिया चालू करतात. अलिकडे नवव्या अथवा दहाव्या दिवसापासून विधी चालू करण्याची पध्दत पडली आहे.

क्रिया करणाऱ्याने स्मशानांत वापरलेले तांब्या, ताम्हण, पळी-भांडे व नेसण्याचे वस्त्र स्वच्छ करून वापरावे.

दहा पिंड देण्यामागे भूमिका अशी आहे की, दहा महिन्यांत गर्भामध्ये मनुष्यदेह पूर्णपणे निर्माण होतो.

पहिल्या महिन्यात जीवाचे डोके निर्माण होते. तर दुसऱ्या महिन्यांत कान, डोळे व नाक निर्माण होतात. तिसऱ्या महिन्यात कंठ, खांदे, भुजा व वक्षस्थळ तसेच चौथ्या महिन्यात बेंबी, लिंग व गुद तयार होतात. पाचव्या महिन्यात ढोपे, मांड्या व पाय तर सहाव्या महिन्यात मेंदू व मर्मस्थाने येतात. सातव्या महिन्यात जीव श्वासोच्छवास करू लागतो. आठव्या महिन्यात दात व नखे येतात व छातीपासून शरीराच्या खालील भागात केस (लोम) येतात. नवव्या महिन्यात वीर्य तर दहाव्या महिन्यात संपूर्ण देह तयार होतो. एक ते दहा पिंड देण्यामागे जीवाला अन्न व पाण्याचा पुरवठा व्हावा, हा उद्देश असतो. तसेच पद्मपुराणातील वचनाप्रमाणे भूलोकांपासून प्रेतलोकापर्यंतचा प्रवास निर्विघ्न होण्यासाठी दहा दिवस तेलाचा अखंड दीप व भोजनसमयी शिदोरी म्हणून अन्न व पाणी ठेवावे.

विधी दहाव्या दिवशी चालू केले, असे गृहित धरल्यास, दहाव्या दिवशी नदीकिनारी अथवा शिव मंदिराजवळ खालील विधी केले जातात.

दहा दिवसापर्यंत अवयव पिंडदान झाल्यावर, आठ पिंड दिले जातात. त्यातील पाच पिंडे प्रथम, तृतीय, पंचम, सप्तम आणि नवम ह्या विषम श्राध्दांसाठी असून उरलेले

तीन पिंड नग्न प्रच्छादन, अग्निसंचय व पाथेय ह्या विधीसाठी असतात. ही श्राध्दे, गव्हाच्या पिठाचे अथवा तांदुळाच्या पिठाचे पिंड, एकाच्याच नावाने तयार करावीत. ह्यानंतर वेदिका श्राध्द केले जाते. ह्या श्राध्दात हळदीच्या पाण्याने त्रिकोण काढून त्यावर पाच मातीचे कुंभ ठेवावेत. प्रत्येक कुंभामध्ये पाणी, गंध, तीळ, दर्भ, फुले, तुलसीपत्र व माका घालावे. प्रत्येक कुंभावर खालीलप्रमाणे पिंड ठेवावेत.

मधल्या कुंभावर - प्रेतपिंड

पूर्वेकडील कुंभावर - प्रेतसखापिंड

दक्षिणेकडील कुंभावर - यमवैवस्वत पिंड

पश्चिमेकडील कुंभावर - कावळ्यासाठी पिंड

आणि उत्तरेकडील कुंभावर - प्रेतपरिवारातील अतृप्त जीवांसाठी पिंड

त्यानंतर उपस्थित असलेल्या नातेवाईकांनी प्रेतपिंडावर तीळ, अक्षता, फुले वाहून विधीकर्त्याने प्रार्थना करावी. त्यानंतर कमीत-कमी अर्धी घटिका म्हणजेच सव्वातास कावळा त्यांच्यासाठी ठेवलेल्या पिंडाला स्पर्श करण्याची वाट पहावी. ह्या संदर्भात काकस्पर्शच का ? अशी शंका काहींच्या मनात येते. त्याविषयीची कथा अशी की, कावळ्यास एकच बुब्बुळ आहे, पण ब्रह्मदेवाच्या वराप्रमाणे सूक्ष्मातील सूक्ष्म अशा गोष्टी पण त्याला दिसते. मनुष्याच्या शरीरातून प्राण निघून गेला, पण वासना शिल्लक राहिली, तर फक्त कावळ्यालाच पिंडाभोवती फिरणारा आत्मा दिसतो. अशा परिस्थितीत कावळा पिंडाला स्पर्श करत नाही. विधीकर्ता मृतात्म्याला वेगवेगळ्या इच्छा बोलून दाखवितो, तरीही काकस्पर्श न झाल्यास, कमीत-कमी सव्वा तास वाट पाहून मगच दर्भाचा कावळा लावावा. ह्यासंबंधी विशेष लक्षात ठेवण्याची गोष्ट म्हणजे कावळ्याने त्याच्यासाठी ठेवलेल्या पिंडाला स्पर्श केला पाहिजे व तसेच ही घटना पिंड जागेवरून न हलविता घडणे आवश्यक आहे. त्यानंतर आलेल्या सर्वांनी अश्म्यावर तिलोदक देऊन, घरी जाऊन, स्नान करून आपापल्या उद्योगाला लागावे.

मृताच्या अकराव्या दिवशी महैकोद्दिष्ट श्राध्द करावे. पुढे करावयाची जी एकोदिष्ट श्राध्दे त्याचे हे प्रकृतीभूत श्राध्द आहे. हे शिजविलेल्या अन्नाने करावे. या श्राध्दाचे ठिकाणी ब्राह्मणभोजन किंवा होम करावा. बत्तीस घास आहुती मंत्राने द्यावेत. (रोज बत्तीस घास अन्न खाल्यास दीर्घायुष्य प्राप्त होते, तसेच आपल्या मुखात दातांची संख्यासुध्दा बत्तीसच आहे.)

आद्यमासिकापूर्वी ब्राम्हणभोजन घालावे. श्राध्द समाप्तीनंतर रुद्रगण अकरा, वसुगण आठ व बारा आदित्यगण ही श्राध्देसुध्दा ब्राम्हण भोजनाने अथवा चटरुपी करावी. अकराव्या दिवशी अथवा बाराव्या दिवशी पददाने द्यावीत. आसन, जोडा, छत्री, अंगठी, तांब्या, यज्ञोपवीत, तूप, अन्न, अन्नपात्र असे हे पदार्थ मिळून एक पददाने होते. अशी एकूण



तेरा पददाने आहेत. ती आपल्या शक्तीप्रमाणे करावीत. (प्रेताचे मार्गक्रमण सुखाने होण्यासाठी ही दाने आहेत.)

वरीलप्रमाणे सोळा मासिक श्राध्दे अकराव्या दिवशी करतात. बाराव्या दिवशी सपिंडी करावयाची असली, तरी ती अकराव्या दिवशीच करण्याचा अधिकार एकोद्दीष्ट विधीने प्राप्त होतो. अधिक मास आला असल्यास, सोळा ऐवजी सतरा मासिक श्राध्दे करावीत.

मृत झालेल्या व्यक्तीचे प्रेतत्व जाऊन, पितर लोकांमध्ये जाण्यासाठी, पित्रादि पुढील तीन पिंडामध्ये मेलेल्याचा पिंड मिळवणे, ह्यालाच सपिंडी म्हणतात. हे करण्याविषयी कालदर्शकामध्ये पुष्कळ काळ सांगितले आहेत. हा विधी पूर्वी आपल्या घरातील पडवीत किंवा गुरांच्या गोठ्यात करीत असत. हल्ली सर्वसाधारणपणे शहरात स्मशान किंवा तत्सम जागेतच करण्याची पध्दत आहे.

अकराव्या-बाराव्या दिवशी, दीड महिन्यात, तिसऱ्या, सहाव्या, अकराव्या मासी किंवा पूर्ण वर्षानंतर दहा दिवस पुढे नांदीश्राध्द निमित्ताकरिता, सपिंडी करावी. असे आठ प्रकार सांगितले आहेत. परंतु कुलधर्म भरपूर आहेत. पुरुषाच्या आयुष्यक्षयाचा विचार करता, बाराव्या दिवशीच सपिंडी करणे योग्य आहे. सपिंडी केल्याशिवाय घरात मंगल कार्य करू नयं. म्हणून बारावा दिवस म्हणजे अशौचसमाप्तीनंतरचा दिवस होय. सपिंडी करण्याचा मुख्य अधिकार ज्येष्ठ मुलास आहे, परंतु वृध्दीश्राध्द (नांदीश्राध्द) युक्त कर्म करणे, असल्यास, कनिष्ठ पुत्र, बंधू, बंधूचा मुलगा किंवा अन्य सपिंड हे करू शकतो. वृध्दीश्राध्द शिजलेल्या अन्नानेच करावी. मृत झालेला मनुष्य, सपिंडी केल्यानंतर पितृलोकांत जातो, यास्तव सपिंडीच्या दुसऱ्या दिवशी पाथेय श्राध्द करावे. तेराव्या दिवशी पाथेय श्राध्द म्हणून पुण्याहवाचन, निधनशांती करून प्रतिदिवशी उदककुंभ श्राध्द करावे. म्हणजे रोज पुरोहिताना तांदुळ व पाणी द्यावे. सपिंडी केल्यानंतर मासिक श्राध्दे, पार्वण विधिने करावीत. मासिक श्राध्दाच्यामध्ये मांगलिक कार्य आल्यास मासिक श्राध्द पुढे ढकलावे.

तेराव्या दिवशी घरी पार्वण विधीने एकदम वर्षभरातील सोळा मासिक श्राध्दे तेराव्याच दिवशी करण्याचा प्रघात पडला असून त्या-त्या महिन्याचा तो विश्रांतीचा व भोजनाचा काळ असल्याने ब्राम्हणभोजन व आप्तेष्ट भोजनासह कार्य केले जाते. भोजनोत्तर मध्यान्हसमयी तो जीवात्मा स्वर्गमार्गस्थ होतो. वरील सर्व विधीच्या विनियोगाने लिंग देह तयार होतो. त्या देहाला वसुगण खालून व रुद्रगण वरच्या बाजूस अशा सुवर्णाच्या साखळदंडाने बंधन करून नेतो. अशा देहाला एक वर्ष अहोरात्र चालून गेल्यावर वर्षभराच्या आदल्या दिवशी तो देह यम दरबारी पोहोचतो. तिथे रुद्रगण व वसुगण त्याला मुक्त करतात. नंतर त्याच्या पाप व पुण्याचा विचार होऊन पुढील जन्माची व्यवस्था होते.